अखिल भारतीय प्राच्यविद्यासम्मेलन
शतवर्ष महोत्सव ग्रंथमाला – ८८

# संस्कृत साहित्यातील प्रसाधन आणि अलंकरण

**डॉ. स्मिता होटे**

प्रधानसंपादक
**आचार्य श्रीनिवास वरखेडी**
कुलगुरु

संपादक
**आचार्य मधुसूदन पेन्ना**
संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग




**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय**
रामटेक, जि. नागपुर (महाराष्ट्र)

२०२०

| | | |
|---|---|---|
| **शीर्षक** | – | **संस्कृत साहित्यातील प्रसाधन आणि अलंकरण** |
| **लेखक** | – | **डॉ. स्मिता होटे** |
| **प्रधानसंपादक** | – | **आचार्य श्रीनिवास वरखेडी**<br>कुलगुरु, क.का.सं.वि., रामटेक |
| **संपादक** | – | **आचार्य मधुसूदन पेन्ना**<br>संचालक, संशोधन व प्रकाशन विभाग,<br>क.का.सं.वि., रामटेक |
| **अखिल भारतीय प्राच्यविद्या सम्मेलन** | – | **प्रो. गौतम पटेल,** अध्यक्ष<br>**प्रो. सरोजा भाटे,** सचिव<br>**प्रो. ग. उ. थिटे,** उपाध्यक्ष |
| **संपादक मंडळ** | – | **डॉ. दिनकर मराठे,** क.का.सं.वि., रामटेक<br>**डॉ. वीणा गानु,** नागपुर. |
| **प्रकाशन वर्ष** | – | **२०२०** |
| **आवृत्ती** | – | **प्रथम** |
| **मूल्य** | – | **रू. २८६/–** |
| **आय.एस.बी.एन.** | – | **९७८–९३–८५७१०–४५–२** |
| **मुखपृष्ठ** | – | **श्री. उमेश पाटील** |
| **मुद्रक** | – | **दुर्गा प्रिन्टींग, नागपूर** |
| **प्रकाशक** | – | **कुलसचिव, क.का.सं.वि., रामटेक**<br>**प्रशासकीय भवन, मौदा रोड, रामटेक.** |

## PREFACE

It is indeed a matter of great pleasure and pride for Kavikulaguru Kalidas Sanskrit University, Ramtek to have this rarest opportunity of hosting the 50th session of All India Oriental Conference at Nagpur. This AIOC-50th session at Nagpur will be forever remembered by all as the year 2019 also happens to be the year of Centenary Celebration of AIOC. The premier objective with which the great scholars of yester years had contemplated and established this national academic event called All India Oriental Conference has been achieved through these years with scores of young scholars contributing significantly to the treasure house of knowledge through their valuable research work.

The research of yore and of the present should be properly recorded so as to make it easily available to all lovers of knowledge and wisdom in the years to come. With this objective, we have contemplated to commemorate the 100th year of this grand event of 50th session of AIOC by way of publishing 100 monographs on different subjects in four languages viz., Sanskrit, Hindi, Marathi and English. It is no doubt a herculean task but still worth of it, for the reason that these 100 monographs will inspire many young scholars to take upon a fresh study and research of the oriental subjects with more vigour and zeal.

The AIOC Centenary Publication Series includes wide variety of subjects like Literature, Language, Veda, Indian Philosophy, Sanskrit Grammar, Law, Children Literature, Yoga, Astronomy and Astrology, Ayurveda, Pali, Prakrit, Jain, Buddhism, Education, Library Science, Poetics, Aesthetics, and Indology. It also includes reprint of some rare texts of academic importance which have gone out of print are not easily available. We wish to mark this centenary celebrations with this series that connects the glory of the past and aspirations of future. I place on record my sincere gratitude to all the authors of these monographs who have kindly contributed to the richness of this series.

I am confident that the books published in these series will definitely inspire the lovers of Oriental Learning in general and of Sanskrit Language and Literature in particular.

On this occasion, we have published a memorable book of all the speeches of Section-Presidents of all previous sessions of AIOC. It is indeed a very capacious addition to any collection. I with all respect thank two eminent scholars of our times - Prof. Gautam Patel, President and Prof. Saroja Bhate, General Secretary, the torch bearers of AIOC who have not only encouraged us in this venture but also made all efforts to provide these valuable historical speeches for us. I thank all executive members of AIOC and my colleagues of the varsity for making this event a grand success. My words fall short in describing the painstaking efforts and scholarly commitment of my esteemed colleague Prof. Madhusudan Penna, local secretary of this session in bringing out this series.

I also take this opportunity to profusely thank Shri. Subhash Jain and Shri Dipak Jain, the proprietors of New Bharatiya Book Corporation, New Delhi for their enthusiastic approach and timely work with all precision and grace.

Let us all sanctify ourselves in the eternal flow of wisdom by reading these books and recommending these to others also!

**सरस्वती श्रुतिमहती महीयताम्**

Ramtek
10th January 2020

Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU

# Kavikulaguru Kalidas Sanskrit University
# All India Oriental Conference

**100th Year 50th Session**
**10th-12th January, 2020**

## Chief Patron
Hon'ble Nitin Gadkari
Minister of Road, Transport & Highways of India

## Patron
Prof. Shrinivasa Varakhedi
Vice Chancellor, KKSU, Ramtek

## AIOC President
Prof. Gautam Patel
Chairman, Sanskrit Seva Samiti, Ahmedabad.

## AIOC General Secretary
Prof. Saroja Bhate
Professor of Sanskrit (Retd.), Pune University, Pune

## AIOC Local Secretary
Prof. Penna Madhusudan
Dean, KKSU, Ramtek

## Additional Local Secretary
Dr. Harekrishna Agasti
Dr. Kalapini Agasti
Dr. Dinakar Marathe
Dr. Parag Joshi

## Organising Committee
Prof. C.G. Vijayakumar, Registrar (I/c) & Dean, KKSU, Ramtek
Prof. Nanda Puri, Dean, KKSU, Ramtek
Prof. Krishnakumar Pandey, Dean, KKSU, Ramtek
Prof. Laita Chandratre, Dean, KKSU, Ramtek
Dr. Ramachandra Joshi, Finance Officer, KKSU, Ramtek
Dr. Umesh Shivahare, Controller of Examination, KKSU, Ramtek
Dr. Dipak Kapade, Librarian, KKSU, Ramtek
Dr. Renuka Bokare, PRO, KKSU, Ramtek

Shri. Rajivranjan Mishra, Technical Head, KKSU, Ramtek
Shri. Pravin Kalambe, Security Officer, KKSU, Ramtek

## Reception Committee

Prof. Shrinivasa Varakhedi, Chairperson Reception Committee & VC, KKSU
Parampujya Govindagiri Swamiji, Rishikesh
Prof. P.T. Chande, Former VC, KKSU
Prof. Uma Vaidya, Former VC, KKSU
Prof. Vijendra Kumar, VC, National Law University, Nagpur
Prof. Rajnish Shukla, VC, National Hindi University, Wardha
Prof. Vinayak Kane, VC, RTM Nagpur University, Nagpur
Shri. Krupal Tumane, Member of Parliament
Shri. Girishji Vyas, Member of Legislative Council
Shri. Chandrashekhar Bawankule, Guardian Minister, Nagpur
Prof. Vishram Jamdar, Director, VNIT, Nagpur
Dr. Bhushankumar Upadhyay, Commissioner of Police, Nagpur
Shri. Vijay Phanshikar, Editor, The Hitavada, Nagpur
Shri. Rajkumar Tirpude, Tirpude Group of Insitutions, Nagpur
Shri. Mohabbat Singh, Tuli International, Nagpur.
Shri. Chandragupta Varnekar, Principal Retd., Nagpur
Shri. Suresh Sharma, Baidyanath, Nagpur
Shri. Prabhakar Rao Mundle, Dharampeth Educational Institutions, Nagpur

## Executive Committee

Prof. G. U. Thite,
Vice President

Dr. Brijeshkumar Shukla,
Treasurer

## Members

Dr. Rajni Satish Chandra Jha
Prof. Shukla Ramakant
Dr. Behera Ranjit
Dr. Meena Shukla
Dr. Nirmala Kulkarni
Dr. Roy Gauri Nath
Dr. Tripathi Uma Rani
Dr. Pushpa Jha
Dr. Basu Ratna
Dr. Mithilesh Kumar
Prof. Singh Prasoon Dutta
Shri. Mishra Arun Ranjan
Dr. Mishra Baidyanath
Dr. Tripathi Rajendra Rasraj
Shri. Harshdev Madhav
Dr. Kamdev Jha
Dr. Parinita Deshpande
Dr. Jha Udayanath (Ashok)

# अभिप्राय

## संस्कृत साहित्यातील प्रसाधन आणि अलंकरण

तगरकुष्ठतामीसपत्रकानुलेपनं सुभगं करणं।

तगर कुष्ठ तालीशपत्र हे तीनही समप्रमाणात घेऊन भिजवून कुटलेला लेप संपूर्ण शरीराचे सौंदर्य वाढवितो (सुभगं करणं)

लोध्रवचाधान्यकै: यौवनपिटकापहो लेप:।
गोरोचनान्वितेन च लेपो मरिचेन तादृक्ष:।।

लोध्र, धणे, वच यांचा समप्रमाणातील लेप किंवा मिरे व गोरोचना यांचा लेप चेहऱ्यावरील दोष दूर करून चेहरा नितळ करतो.

वरील लेखिकेने अभ्यासपूर्ण लिखाणाने विषयाला पूर्ण न्याय दिला आहे हे ठामपणे मान्य केले पाहिजे. या जगात जेव्हापासून स्त्री आली असेल तेव्हापासून या ना त्या रूपात अलंकरणाचा प्रयोग सुरू झाला. प्रथम वेदांच्या रूपात व नंतर ललित रचनाद्वारे संस्कृत साहित्य उपलब्ध असल्याने व ते जागतिक साहित्यात प्राचीनतम असल्याने प्रसाधने व अलंकरणाचे प्राचीनतम वर्णन याच साहित्यात आढळते. लेखिका डॉ. स्मिता सुधीर होटे यांनी ही बाब हेरून वरील विषयात प्रस्तुत केलेले शोधकार्य उत्कृष्ट दर्जाचे असून प्रसाधने व अलंकारांचे कालसापेक्ष व स्थानसापेक्ष सर्व पैलू अत्यन्त समर्पकपणे या पुस्तकात प्रस्तुत केले आहेत. वेदवाङ्मय, बृहत्संहिता, कालिदासीय साहित्य, आर्षमहाकाव्ये, शिल्पशास्त्र, बौद्ध ललितवाङ्मय, संस्कृत ललित महाकाव्ये इत्यादि अनेक प्राचीन संस्कृत ग्रंथाचे दाखले देत अत्यन्त अभ्यासपूर्ण रीतीने डॉ. होटे यांनी विषयाची मांडणी व विस्तार या ग्रंथात केलेला आहे. संस्कृत शिलालेखाद्वारेही स्त्रियांची केशभूषा, वेशभूषा, देहभूषा यांची स्थानपरत्वे कालपरत्वे माहिती मिळते. शिलालेखात उल्लेखिलेल्या पार्वती, लक्ष्मी, दुर्गा, इंद्राणी, सरस्वती, अप्सरा, गंगा, यमुना इत्यादी देवतांच्या व अन्य स्त्रियांच्या मूर्तीवरील दागिन्यांचे वर्णन मूर्तिविज्ञान साहित्यात आढळते. त्याचे अध्ययन त्या-त्या काळातील अलंकरणाची व प्रसाधनांची माहिती देते. स्त्रीदेह

आकर्षक करण्यासाठी केशभूषा, वेशभूषा, देहभूषा, विलेपन अशा चार महत्त्वाच्या मुद्यांचा सखोल, साधार, समर्पक उहापोह या ग्रंथात आहे. महत्त्वाचे म्हणजे अलंकरणाचे केलेले वर्णन हे वाचकाला समजावे यासाठी संबंधित चित्रावली देखील परिशिष्टात बघायला मिळते. विषय आकलनीय करण्यासाठी ही जमेची बाजू आहे.

आज संस्कृतात शोधकार्य मोठ्या प्रमाणात सुरू आहे. त्यात वेदकालीन, उपनिषदकालीन, स्मृतिकालीन, महाभारतकालीन स्त्रीजीवनाचे सर्वांगीण वर्णन करणारे प्रबंध उपलब्ध आहेत. या प्रबंधांप्रमाणे डॉ. होटे यांनी घेतलेला हा विषय अलंकरण व प्रसाधनांपुरता मर्यादित असला तरी अत्यन्त महत्त्वाचा असल्याने संस्कृत साहित्याला इतिहासदृष्ट्या गौरवास्पद ठरविणारा आहे. जगातील सर्व सौन्दर्य प्रसाधनांचे, वस्त्र प्रसाधनांचे, अलंकारांचे व विलेपनांचे सूक्ष्म व व्यापकरूप मुळात संस्कृत साहित्यातून जगापुढे आले आहे. ही अत्यंत मोलाची बाब या प्रबन्धाने वाचक जगापुढे आणली आहे. या प्रबन्धातून ही बाबही स्पष्ट होते की, प्रसाधने केवळ स्त्रियाच वापरत असत असे नसून पुरुषही काही प्रमाणात याचा मुखसौन्दर्यासाठी प्रयोग/उपयोग करीत असत. ललित संस्कृत साहित्यात तर या आभरणांचे वर्णन असंख्य ठिकाणी आलेले आढळते. केशभूषा, वेशभूषा, देहभूषा विलेपन ही सर्वांग सुशोभीकरण प्रक्रिया ढोबळमानाने सारखीच असली तरी त्यात प्रदेशनिहाय प्रचंड प्रमाणात विविधता बघायला मिळते. हीच बाब डॉ. होटे यांनी या प्रकल्प प्रबंधात नेमकेपणाने प्रस्तुत केली आहे.

''कचधार्य देहधार्य परिधेयं विलेपनं।
चतुर्धा भूषणं प्राहु: स्त्रीणां अन्यच्चदैशिकम्''।।

वाकाटकांच्या राजधानीचे रामटेकजवळ उत्खनन झाले. त्यात अनेक स्त्रियांच्या मूर्ती सापडल्या. त्यात स्त्रियांनी परिधान केलेले पोषाख, केलेली केशरचना, घातलेले अलंकार आणि प्रदर्शित केलेला देहभाग वैविध्यपूर्ण आहे. आज पारंपरिक विलेपनांच्या ऐवजी सेंट अत्तरांचा पर्याय मोठ्या प्रमाणात आढळतो. मेहेंदी बरोबरच टाटू हा सुशोभिकरणाचा प्रकार आढळतो. वस्त्रप्रावरणात तर मोठ्या प्रमाणात परिवर्तन झाले असून स्त्रीदेहाच्या प्रदर्शनातही वाढ झालेली आढळते, हे परिवर्तन भौगोलिक किंवा जनसामान्यात नसून प्राधान्याने समाजातील उच्च आर्थिक स्तरांमध्ये आढळते.

लेखिकेने अनेक ग्रंथाचे आलोडन करून त्यातील समर्पक उद्धरणे उद्धृत करून अत्यन्त अभ्यासपूर्ण असे हे शोधलिखाण प्रस्तुत केले आहे. मराठी, हिन्दी

प्रमाणे इंग्रजी ग्रंथांना सुद्धा या प्रबन्धात स्थान दिले आहे. ग्रंथाचा हा विषय अजरअमर असल्याने हा प्रबंध स्त्रीपुरुषांच्या सौन्दर्य साधनांचा इतिहास लिहिताना संस्कृत साहित्याचे महत्त्व व माहात्म्य साहित्यिकापर्यंत पोहचविणारा असल्याने माझी लेखिकेला विनंती आहे की, प्रचंड व्याप्ती असलेला हा विषय तितक्याच व्यापक प्रमाणात आचार्य पदवी प्रबंधाच्या रूपात विस्तारित केल्यास तो प्रबंध या विषयावरील मैलाचा दगड ठरू शकेल.

लेखिकेने हा जो लघुशोध प्रबंध पुस्तक रूपाने सादर केला आहे, तो प्रसाधन व अलंकरण या विषयाची वाचकांसमोर पूर्णपणे व्याप्ती मांडणारा असून न्याय देणारा आहे हे नि:शंकपणे म्हणता येईल. या शोधकार्याबद्दल मी लेखिका डॉ. स्मिता होटे यांचे हार्दिक अभिनंदन करतो व अशाच प्रकारे जीवनाशी संबंधित अन्य विषयांवरही संस्कृतस्रोतांतून लिखाण करून संस्कृत साहित्याचे ऐतिहासिक महत्त्व वाचकजगतापुढे पुनश्च आणावे अशी अपेक्षा करतो.

**'शम्'**

**डॉ. पंकज चांदे**
**पूर्व कुलगुरु,**
**कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय,**
**रामटेक**

# अनुक्रमणिका

# पूर्वभाष्य

आमच्या महाविद्यालयातील, संशोधनाला पोषक अशा वातावरणात संशोधनाला प्रोत्साहन देणाऱ्या छोट्या-मोठ्या कार्यक्रमाचे आयोजन नियमित होत असते. याशिवाय परिषदा, सम्मेलने या निमित्ताने शोधनिबंध लिहिताना संशोधनवृत्तीला सतत चालना मिळते. त्यामुळे अभ्यासासाठी सतत वेगवेगळे विषय खुणावत असतात.

**विषयाची निवड -**

सुमारे पंधरा सोळा वर्षापूर्वी गुरुवर्य कै.डॉ.के.रा.जोशी यांच्या प्रेरणेने 'बृहत्संहितेतील प्रसाधन' या विषयावरील भाषणासाठी आकाशवाणीच्या 'सुरभारती' कार्यक्रमाचे बोलावणे आले. त्या निमित्ताने बृहत्संहितेचे वाचन झाले आणि सुमारे पंधराशे वर्षांपूर्वी वराहमिहिराने केलेल्या प्रसाधनांचा विचार पाहून मन अचंबित झाले तेव्हापासून 'संस्कृत साहित्यातील प्रसाधन' हा विषय मनात पिंगा घालू लागला.

पुढे रामटेक येथील कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाने आयोजित केलेल्या राज्यस्तरीय परिषदेत 'कालिदासाच्या साहित्यातील प्रसाधने' या विषयावर शोधनिबंध वाचनासाठी तत्कालीन कुलगुरू डॉ. उमा वैद्य यांचे निमंत्रण मिळाले. त्या अभ्यासाच्या दरम्यान 'प्राचीन काळातील प्रसाधन' हा विषय मनात चांगलाच रुजला. कालिदासाच्या साहित्याचा, प्रसाधनाच्या दृष्टीने धांडोळा घेताना हाती आलेल्या सामग्रीने मनात रुजलेला विषय बहरत गेला. त्यामुळे एकंदरीत 'संस्कृत साहित्यातील प्रसाधन' या विषयी अपार कुतुहल मनात निर्माण झाले. पुढे डेहराडूनला झालेल्या आंतरराष्ट्रीय परिषदेत यावर निबंधवाचन केले पण हा केवळ

शोधनिबंधाच्या मर्यादेत बसणारा विषय नाही तर संशोधन प्रकल्प घेण्यासारखा विषय आहे याची खात्री पटली आणि लघुशोध प्रकल्पासाठी 'संस्कृत साहित्यातील प्रसाधन आणि अलंकरण' हा विषय निश्चित केला.

**संशोधनाचे उद्दिष्ट –**

आज प्रसाधनशास्त्र ही स्वतंत्र ज्ञानशाखा म्हणून उदयास आली आहे. परंतु त्या शास्त्राच्या अभ्यासकाला भारतीय प्रसाधनाचे मूळ संस्कृतात आहे याचा मागमुसही नाही. तेव्हा आधुनिक प्रसाधनशास्त्राच्या मूळांचा संस्कृत साहित्यात शोध घेणे हे या संशोधनाचे मुख्य उद्दिष्ट आहे.

प्रसाधन आणि अलंकरण संबंधातील भारतीयांनी जगाला दिलेले योगदान प्रकाशात आणणे आणि त्या निमित्ताने भारतातील वैभवाचा, समृद्ध परंपरांचा, लोकविश्वासाचा, चालीरितींचा शोध घेणे आणि हा एक समाजशास्त्रीय दस्ताऐवज म्हणून समाजासमोर आणणे हा ही या संशोधनाचा उद्देश आहे.

ह्या संशोधन प्रकल्पाच्या प्रवासाच्या दरम्यान या विषयाला अनेक आयाम आहेत हे लक्षात आले. आजचे युग हे आंतरविद्याशाखीय संशोधनाचे आहे. ह्या संशोधनाला आंतरविद्याशाखीय संशोधनाचे पैलू आहेत हे लक्षात घेऊन संस्कृतातील शास्त्रीय ग्रंथांचाही समावेश ह्या संशोधनात करण्यात आला आहे. अर्थशास्त्र, कामशास्त्र, नाट्यशास्त्र, शिल्पशास्त्र, आयुर्वेद इत्यादी ग्रंथातून संशोधनविषयाची सामग्री गोळा करण्यात आली. त्यामुळे सर्वेक्षण पद्धती, अंतर्वस्तुविश्लेषण, संश्लेषण या संशोधनपद्धतीचा उपयोग येथे करण्यात आला. हे संशोधन परिचयात्मक आणि सारशोधात्मक स्वरूपाचे आहे.

प्रबंधाच्या शीर्षकात प्रसाधन आणि अलंकरण हे दोन शब्द योजले आहेत. परंतु संस्कृतमध्ये हे दोन्ही शब्द समान अर्थाचे वाचक आहेत हे सुक्ष्म अभ्यासांती लक्षात आले. तरी पण प्रबंधाचे माध्यम मराठी असल्याने 'प्रसाधन' हा शब्द रूढार्थानुसार घेतला असे समजावे. त्यात विलेपनादी सर्व प्रसाधन द्रव्यांचा

(Cosmatics) समावेश होतो आणि 'अलंकार' ह्या परिभाषेत वस्त्रप्रसाधन, केशप्रसाधन आणि शरीरावर धारण करावयाचे नैसर्गिक आणि धातुनिर्मित अलंकार ज्याला 'दागदागिने' हा शब्द परंपरेने वापरतो त्यांचा समावेश करण्यात आला आहे.

**संशोधनाच्या मर्यादा आणि व्याप्ती –**

संस्कृत साहित्यातील प्रसाधन आणि अलंकरण यांचा शोध घेताना साधारणत: वेद,आर्ष महाकाव्य, पुराणे, पंचमहाकाव्ये, नाट्यसाहित्य, गद्यसाहित्य इत्यादी इ.स. १२०० वर्षापर्यंतच्या काळाचा स्थूलमानाने आढावा घेण्यात आला आहे. म्हणजे ५००० ते ६००० वर्षातील प्रसाधनाचा आलेख या पुस्तकातून मांडण्यात आला आहे.

याशिवाय या कालावधीत निर्माण झालेल्या अर्थशास्त्रादी शास्त्रीय ग्रंथात कधी अनुषंगाने तर कधी विशेष संदर्भात आलेल्या प्रसाधनांच्या उल्लेखांचा परामर्ष येथे घेण्यात आला आहे.

प्रसाधन आणि अलंकरणाचा आलेख कालक्रमानुसार मांडण्याचा यथामती प्रयत्न केला आहे. पण संशोधनाच्या सोयीसाठी प्रसाधनाच्या वर्गीकरणानुसार हा आलेख मांडण्यात आला आहे.

संशोधनातील सुसूत्रतेसाठी पुस्तकाची पुढील प्रकरणात विभागणी करण्यात आली आहे.

**प्रकरण पहिले – उपोद्घात**

विषयाची भूमिका आणि त्यासंबंधी भारतीय चिंतन याचा विचार या प्रकरणात करण्यात आला आहे.

**प्रकरण दुसरे – संस्कृत साहित्यातील वस्त्रप्रसाधन**

वेदकाळापासून प्रचलित असलेल्या वस्त्रप्रसाधनांचा आढावा या प्रकरणात घेण्यात आला आहे.

**प्रकरण तिसरे – संस्कृत साहित्यातील केशप्रसाधन**

यात केशरक्षण, केशरंजन, केशविन्यास (केसरचना) आणि केशभूषा/केशसज्जा असा चार प्रकारे केशप्रसाधनांचा विचार करण्यात आला आहे.



**प्रकरण चवथे – संस्कृत साहित्यातील देहप्रसाधन (अलंकरण)**

यात धातुनिर्मित अलंकार आणि निसर्गनिर्मित अलंकारांचा कालक्रमानुसार विचार करण्यात आला आहे.

**प्रकरण पाचवे – संस्कृत साहित्यातील विलेपन**

यात शरीरावर विशेषत: चेहऱ्यावर योजण्यात आलेल्या सौंदर्यवर्धक द्रव्यांचा विचार करण्यात आला आहे.

**प्रकरण सहावे – उपसंहार**

ह्या शेवटच्या प्रकरणात विषयाचा उपसंहार करण्यात आला आहे. त्यात हाती आलेल्या निष्कर्षाची मांडणी करण्यात आली आहे.

पुस्तकाच्या शेवटी **संदर्भ ग्रंथसूची** देण्यात आली आहे.

पुस्तकाच्या रूपात प्रकाशित होणारे हे संशोधनकार्य अधिकाधिक निर्दोष व्हावे याचा यथामती, यथाशक्ती प्रयत्न करण्यात आला आहे. पण मनुष्याची स्खलनशीलता लक्षात घेऊन न्यूनाधिक्य राहाण्याची शक्यता नाकारता येत नाही. हे लक्षात घेऊन अनवधनाने राहिलेल्या सर्वच दोषांसाठी मी क्षमाप्रार्थी आहे.

विद्यापीठ अनुदान आयोगाने पुरस्कृत केलेला हा लघुशोध प्रकल्प आज पुस्तकरूपाने वाचकांच्या हाती देतांना अतिशय आनंद होत आहे. वेगळ्या विषयावरील ह्या पुस्तकाचे जिज्ञासू वाचक, अभ्यासक आणि संस्कृत रसिक स्वागत करतील असा विश्वास वाटतो.

ह्या वर्षी अखिल भारतीय प्राच्य विद्या परिषदेला शतकपूर्तीचे भाग्य लाभले आहे आणि परिषदेतर्फे आयोजित केल्या जाणाऱ्या अधिवेशनाचे हे सुवर्ण महोत्सवी वर्ष आहे. ह्या सुवर्णमहोत्सवी अधिवेशनाच्या यजमानपदाचा मान कविकुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाला मिळाला आहे ही वैदर्भीयांसाठी अत्यंत भाग्याची आणि अभिमानाची बाब आहे. शतकपूर्ती आणि सुवर्णपूर्ती अशा देवदुर्लभ मणिकांचन योगाचे साक्षीदार बनण्याचे भाग्य या पुस्तकाला लाभत आहे. हा भाग्ययोग घडविणारे कवि –कुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालयाचे उपक्रमशील आणि उत्साही कुलगुरू माननीय डॉ. श्रीनिवास वरखेडी, पुस्तक प्रकाशन समितीचे अध्यक्ष डॉ. मधुसूदन पेन्ना आणि समन्वयक डॉ. वीणा गानू तसेच संबंधित पदाधिकारी आणि कर्मचारी या सर्वांची मी मन:पूर्वक ऋणी आहे.



**डॉ. स्मिता होटे,**

# प्रकरण पहिले

# उपोद्घात

स्वरूपा नाम ते माता सरूपो नाम ते पिता।
सरूपकृत् त्वमोषधे सा सरूपमिंद कृधि ।।

हे वनस्पती, तुझी आई सुंदर आहे, तुझे पिता
सुंदर आहे, तू स्वतः सुंदर करणारी आहेस.
तू या शरीराला सुंदर बनव.
अथर्ववेद

# प्रकरण पहिले
# उपोद्घात

भारतीय संस्कृती सत्य–शिव–सुंदर ह्या तीन तत्त्वांची पूजा करणारी आहे. सत्य हा ह्या संस्कृतीचा प्राण आहे तर शिव म्हणजे कल्याण. ''वसुधैव कुटुंबकम्' या भावनेने संपूर्ण जगाचे कल्याण चिंतणारी आमची संस्कृती! सत्य, शिव यासोबत सुंदरतेची उपासना करणारी ही संस्कृती! सौंदर्य बहिरंगाचे असो अथवा अंतरंगाचे, प्राचीन काळापासून भारतीय संस्कृतीने सौंदर्यावर प्रेम केले आहे. आंतरिक सौंदयासाठी भारतीयांनी दैवी गुणांची, सद्गुणांची उपासना केली तर बाह्य सौंदर्यासाठी त्यांनी प्रसाधनांची मदत घेतली. सौंदर्याच्या बाबतीत आजही साऱ्या  जगात भारत अग्रणी आहे. रिता फारीया (१९६६), सुष्मिता सेन (१९९४), ऐश्वर्या राय (१९९४), डायना हेडन )१९९७), युक्ता मुखी (१९९९), प्रियंका चोपडा (२०००), मानुषी छिल्लर (२०१७) या सौंदर्यवतींनी आंतरराष्ट्रीय सौंदर्यस्पर्धेत अव्वल स्थान पटकावून भारतीय सौंदर्याला जागतिक उंचीवर नेलं आहे.

ही सौंदर्यपरंपरा प्राचीन काळापासून चालत आली आहे. शंकरासारख्या वितरागी देवाचे मन जिंकणारी पार्वती, त्रिभुवनसुंदरी रुख्मिणी, आपल्या रूपाने सर्वांचे दमन करणारी दमयंती, चारूगात्री सीता, चिरतारुण्याचे वरदान लाभलेली कुन्ती आणि सावळ्या सौदर्यांचा मापदण्ड असलेली याज्ञसेनी द्रोपदी ह्या त्या त्या काळच्या सौंदर्य सम्राज्ञी होत्या.

आता प्रश्न असा उद्भवतो की प्राचीन काळी ह्या स्त्रिया आपल्या सौंदर्याची काळजी कशी घेत? ह्याचे उत्तर आपल्याला प्राचीन संस्कृत साहित्यात आणि शास्त्रीय ग्रंथात आढळते. संस्कृत साहित्य हे प्राचीन भारतीय इतिहासाचे दस्तऐवज आहे. कोणतेही साहित्य हा तत्कालीन  समाजाचा आरसा असतो. वेद, रामायण, महाभारत , पुराण वाङ्मय तसेच

अभिजात संस्कृत साहित्य, चाणक्य, वात्सायन, चरक, सुश्रुत, वराहमिहिर, शारंगधर, सोमेश्वर यांच्या शास्त्रीय ग्रंथावरून तत्कालीन समाजात अस्तित्वात असलेल्या सौंदर्य प्रसाधनावर लख्ख प्रकाश पडतो. एवढेच नव्हे तर त्याकाळी प्रसाधन 'कला' म्हणून त्यासंबंधी गंभीर चिंतन होत होते असे लक्षात येते.

प्राचीन संस्कृत साहित्यातील आणि शास्त्रीय ग्रंथातील विविध प्रसाधनांचा मागोवा घेतांना प्रश्न पडतो की मनुष्याला प्रसाधनांची गरज का पडली. तर त्याचे उत्तर माणसाची सुंदर दिसण्याची आवड हेच होय. सौंदर्याचा महिमा त्रिकालाबाधित आहे. नाटककार भास म्हणतो, " सर्वजनमनोभिरामं सौंदर्यं नाम।"

सौंदर्य कोणाचेही मन मोहून घेते. त्यामुळे प्रत्येकच व्यक्ती आपल्या सौंदर्याच्या बाबतीत जागरूक असते. सुंदर दिसण्याची आवड एक नैसर्गिक प्रवृत्ती आहे. त्यानुसार आपल्या निसर्गदत्त सौंदर्यात भर घालण्यासाठी प्रत्येकजण धडपडत असतो. आपल्या स्वाभाविक सौंदर्याला अलंकाराने, वेशभूषेने, केशभूषेने आणि सौंदर्य प्रसाधनाने अधिकाधिक आकर्षित करण्यासाठी आधुनिक काळाप्रमाणे प्राचीन काळी देखील स्त्रीपुरुष सतर्क होते हे प्राचीन संस्कृत साहित्यावरून सहज लक्षात येते.

आज सौंदर्यप्रसाधनात मुख्यत्वे चेहऱ्याला अथवा त्वचेला लावण्यात येणाऱ्या क्रिम, पावडर, लिपस्टिक, केसांना लावायचे तेल, शाम्पू, जेली, डाय इत्यादींचा समावेश होतो. आधुनिक प्रसाधनशास्त्रांच्या मते,"शरीराच्या सौंदर्यवृद्धीकरिता किंवा संरक्षणाकरिता शरीरात किंवा शरीरावर ज्या वस्तूंचे मर्दन, लेपन, सिंचन केले जाते ती वस्तू म्हणजे प्रसाधन होय."

Cosmetic means an article intended to be rubbrd, poured, sprinkled on the body for beautification or protection of body.



प्राचीन काळी प्रसाधनशास्त्र 'शास्त्र' म्हणून विकसित झाले नसले तर कला म्हणून त्यासंबंधी चिंतन होत होते. एवढेच नव्हे तर वात्सायनाने

कामसूत्रात ६४ कलेमध्ये प्रसाधनविधीचा कला म्हणून उल्लेख केला आहे. तसेच त्याने निर्दिष्ट केलेल्या ६४ कलांच्या यादीत १२ कला विविध प्रसाधनांशी संबंधित आहे.

प्राचीन काळी प्रसाधनात केशभूषा, वेशभूषा, देहभूषा आणि विलेपन अशा चार गोष्टींचा समावेश होत होता ते उत्तरमेघातील पुढील श्लोकावरून लक्षात येते.

वासश्चित्रं मधु नयनयोर्विभ्रमादेशदक्षं
पुष्पोद्भेदं सह किसलयैर्भूषणानां विकल्पान्।
लाक्षारागं चरणकमलन्यासयोग्यं च यस्या
मेकः सूते सकलमबलामण्डनं कल्पवृक्षः ।।११।।

**अर्थ** – त्या अलका नगरीत चित्रविचित्र रंगाची वस्त्रे, नेत्रांच्या हावभावांची शिक्षा देण्यांत दक्ष असे मद्य, कोवळ्या पानांसह उमलेली फुले, अलंकाराचे निरनिराळे प्रकार आणि चरणकमलांना लावण्यास योग्य असा लाक्षारस ही सर्व स्त्रियांचे भूषण प्रकार एकटा कल्पवृक्ष देत असतो.

या श्लोकवरील संजीवनी टीकेत मल्लीनाथ म्हणतो –

**'अबलामण्डनं योषितप्रसाधनजातम्।'** अर्थात तरुण स्त्रियांना अलंकृत, मण्डित करणाऱ्या सजविणाऱ्या सर्व वस्तूंना प्रसाधन म्हणतात. पुढे आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ मल्लीनाथाने रसाकर कोषाचा दाखला दिला आहे.

'कचधार्यं, देहधार्यं, परिधेयं, विलेपनं।
चतुर्धा भूषणं प्राहुः स्त्रीणामन्यच्चदैशिकम्'।।

अर्थात केशभूषा, देहभूषा व परिधान आणि विलेपन ही स्त्रियांची चार प्रकारची भूषणे आहेत. बाकीची देशकालानुरूप जाणावी.

मल्लीनाथाने केलेल्या प्रसाधनाच्या व्याख्येनुसार स्त्रियांची जी जी भूषणे म्हणजे ती ती सर्व प्रसाधने आहे. त्याच न्यायाने रसाकरकोषातील केशभूषा, देहभूषा, परिधान आणि विलेपन ही सर्व भूषणे प्रसाधने आहेत. येथे एका गोष्टीचा आवर्जून उल्लेख करावासा वाटतो की संस्कृतमध्ये भूषण, अलंकार, अवतंसन, आभरण, मण्डन इत्यादी शब्द एकाच अर्थाने योजिले

जातात. अमरकोषकार म्हणतो,''अलंकारत्वाभरणं परिष्कारो विभूषणम् मण्डनम्'' प्रसाधनांच्या जागी या सर्वांचा पर्यायी शब्द म्हणून उपयोग केल्या जातो. त्यातही अलंकार हा शब्द अधिक प्रचलित आहे आणि अधिक व्यापक आहे. अलंकार म्हणजे जो शोभेला (सौंदर्याला) अलम् म्हणजे पूर्ण करतो (अलं करोति इति अलंकार:) राजानक रूय्यकाने पुढील सर्व गोष्टींना अलंकार संज्ञा दिली आहे.

रत्नं हेमांशुके माल्यं मण्डनद्रव्ययोजने।
प्रकीर्णं चेत्यलंकारा: सप्तैवेते मया मत:।।

भरतमुनींनी देखील अलंकारात माल्य, आभरण आणि वस्त्रांचा समावेश केला आहे.

अलंकारस्तु विज्ञेयो माल्याभरण वाससा।

आभरणात विविध धातूनिर्मित अलंकारांची चर्चा करून तिलक, पत्रावली इत्यादींना विशेष अलंकार म्हटले आहे.

तिलक: पत्ररेखाश्च भवेद् गण्डविभूषणम्।।

म्हणजे भरतमुनीं सारख्या प्रस्थापित शास्त्रकारांचीही मल्लीनाथाच्या वरील प्रसाधनाच्या व्याख्येला मान्यता होती असे दिसते.

आज देशाच्या आर्थिक उलाढालीचा फार मोठा भाग असलेली सौंदर्य प्रसाधने चैनीच्या वस्तू राहिल्या नसून ती लोकांची दैनंदिन गरज बनली आहे. एवढे त्याचे महत्त्व वाढले आहे. सौंदर्य प्रसाधन शास्त्र (Cosmetic technology) ही नवीन ज्ञानशाखा गेल्या तीन-चार दशकापासून उदयाला आली आहे. दूरदर्शनसारख्या प्रसारमाध्यमांवर प्रसाधनांच्या जाहिरातींनी कब्जा मिळविला आहे आणि त्या प्रसाधनांनी तरुणाईचे मन आणि धन दोन्ही काबीज केले आहे. अशा या प्रसाधन शास्त्रांच्या मूळाचा शोध घेण्याचा प्रयत्न केल्यास आपला शोध प्राचीन संस्कृत साहित्यापासून येऊन थांबतो. मात्र प्रसाधन शास्त्रांच्या आधुनिक विद्यार्थांना संस्कृत साहित्य आणि शास्त्रीय ग्रंथ याविषयीच्या अज्ञानामुळे या शास्त्रांच्या खऱ्या इतिहासापासून वंचित रहावे लागते.

भारतीय चिंतनाप्रमाणे वर्तमानकालात प्रचलित असलेली प्रसाधने ही प्राचीन प्रसाधनांचा फक्त एक चतुर्थांश भाग आहे. कारण उरलेल्या तीन भागात भारतीयांनी अलंकार, वस्त्रप्रावरणे आणि केशप्रसाधने यांना स्थान दिले आहे. ही बाब लक्षात घेता एखाद्या गोष्टीकडे पाहण्यांची भारतीयांची दृष्टी किती व्यापक आणि उदार होती हे लक्षात येते. आज आपण त्या काळाच्या मानाने कितीतरी मागे आहोत याची जाणीव प्राचीन प्रसाधने देतात.

आधुनिक प्रसाधनांपैकी अर्धीअधिक प्रसाधने केसांशी संबंधित आहेत. हे लक्षात घेता आपल्या पूर्वजांनी त्याकाळी केशप्रसाधनांना दिलेले 'मूर्धन्य' स्थान लक्षात येते.

प्रसाधनांचा दुसरा प्रकार म्हणजे 'परिधेयम्' अर्थात वस्त्र-प्रावरणे. प्राचीन साहित्यिकांनी वस्त्र-प्रावरणाला प्रसाधनात स्थान दिले कारण आपले व्यक्तित्व खुलविण्यात वस्त्र प्रसाधनांचा फार मोठा वाटा असतो. हे त्यांच्या लक्षात आले होते. आज वस्त्रोद्योगशास्त्र ही देखील नवीन ज्ञान शाखा निर्माण झाली आहे. देशातील फार मोठी आर्थिक उलाढाल करणारा असा वस्त्र व्यवसाय एक प्रमुख व्यवसाय ठरला आहे. आज त्या संबंधी स्वतंत्र मंत्रालय देखील उभे झाले आहे. वस्त्र-प्रावरणांची विविध प्रदर्शने (Fashiom Shows) आयोजित केली जातात. लोकांची आवड/कल घडविण्याची ताकद या वस्त्रोद्योगात आहे आणि याला प्रसारमाध्यमे प्रभावीपणे हातभार लावतात. पण जेव्हा या सोयी नव्हत्या तेव्हा वस्त्राला प्रसाधनात महत्त्वाचे स्थान देणारे आपले पूर्वज दूरदृष्टीचे होते असे म्हणायला हवे.

प्राचीन प्रसाधनातील तिसरा प्रकार म्हणजे देयधार्य. देहाला सजविण्यासाठी योजण्यात येणारे फुले, गजरे इत्यादी नैसर्गिक अलंकार तसेच सुवर्णरत्नादी अलंकार यांनाही पूर्वसूरींनी प्रसाधनात समाविष्ट केले.

भारतीय स्त्रीयांची अलंकाराची आवड सुविख्यात आहे. सण समारंभात तसेच विवाह इत्यादी जीवनातील महत्त्वाच्या प्रसंगात अलंकार हे

प्रतिष्ठेचे वैभवाचे, प्रतीक म्हणून मिरविले जातात. आज भारतातील सोन्या-चांदीच्या अलंकाराच्या निर्मितीचा व्यवसाय जागतिक बाजारपेठेला प्रभावित करतो. आज भारत हा सोन्याची जागतिक बाजारपेठ बनला आहे. हिरे आणि दागिन्यांची निर्यात करणारा जगातील एक प्रमुख देश आहे. आणि या माध्यमातून देशाला मिळणारे परकीय चलन बहुमोल आहे. प्राचीन भारतीयांची ही सोन्यासंबंधी अमर्याद आवड भारताच्या वैभवशाली इतिहासाची साक्ष देते आणि त्या वैभवशाली इतिहासाच्या खाणाखूणा आजच्या भारतीय स्त्रिया दागिन्यांच्या रूपाने अभिमानाने मिरवितात असे म्हणण्यास वावगे ठरणार नाही.

जगातील सर्वाधिक सोन्याचा साठा भारतात आहे आणि त्यातील अर्धेअधिक सोने भारतीय स्त्री धनाचा भाग आहे. भारतीयाजवळ आज मितीला अंदाजे तेवीस हजार टन सोने आहे आणि त्याचे आजचे मूल्य आठशे अब्ज डॉलर आहे. असे असूनही आपली सोन्याची गरज पूरविण्यासाठी भारत सरकारला दरवर्षी सोने आयात करावे लागते. गेल्या तीन वर्षात भारताने अनुक्रमे ६९१ टन, (२०१८) ८७६.२ टन(२०१७) आणि १००० टन(२०१६) सोने आयात केले आहे. वरील आकड्यावरून भारतीय समाजाची सोन्याची अपरंपार हौस लक्षात येते. परंतु या हौसेपोटी आपल्या परकीय चलनाचा फार मोठा हिस्सा सोन्याच्या आयातीवर खर्च होतो. याचा विपरीत परिणाम अर्थव्यवस्थेवर होतो. त्यामुळे भारतीय रुपयांचे डॉलरच्या तुलनेत नेहमी अवमूल्यन होत असते. या सर्व उलाढालीच्या पाठीमागे भारतीय समाजाची अलंकारप्रियता, लोकविश्वास, सण-उत्सवातील सोन्याचे महत्त्व तर आहेच पण या सर्वाच्या मूळांशी प्राचीन भारताचे वैभवशाली इतिहासाचे दर्शनही आपल्याला घडते.प्राचीन भारतीयांचे हे प्रसाधनांचे वेड कालौघात तसूभरही कमी झाले नाही हे निर्विवाद लक्षात येते.



----

**संदर्भ सूची**

१ स्वप्न अंक - ३
२ Harry Cosmotology by Willkinson & Moore, page 64
३. उत्तरमेघ, पृ. १२१
४. तत्रैव, पृ. १२२
५. अमरकोष,२/१२७६
६. काव्यमाला पंतमगुच्छ, पृ.१४८
७. ना.शा. २३/१०
८. ना.शा. २३/३६
९. अर्थपूर्ण ले. यमाजी मालकर, आसमंत पुरवणी दै. तरुण भारत, पृ.२ दि.२३.१२.१८
१०. तत्रैव

---

# प्रकरण दुसरे

# संस्कृत साहित्यातील वस्त्रप्रसाधन

काम्यं यशस्यमायुष्यमलक्ष्मीघ्नं प्रहर्षणम् ।
श्रीमत्परिषदि शस्त निर्मलाम्बरधारणम् ।।

निर्मल वस्त्र धारण केल्याने इच्छापूर्ती होते, यश, आयुष्य, वैभव, आनंद आणि संपन्न समाजात प्रशंसा मिळते.

सुश्रुत

## प्रकरण दुसरे

# संस्कृत साहित्यातील वस्त्रप्रसाधन

अन्न, वस्त्र , निवारा ह्या मानवाच्या मूलभूत गरजा होय. यापैकी अन्न आणि निवारा या दोन गरजा पशुपक्षी इत्यादी मनुष्येतर प्राण्यात दिसून येतात तर वस्त्र फक्त माणूसच धारण करतो. म्हणजे वस्त्रांची गरज मनुष्याचे इतर प्राण्यांपासून वेगळेपण सिद्ध करते. आजघडीला दिंगबर अवस्थेत राहणाऱ्या काही आदिम जमाती सोडल्या तर अनेक आदिवासी किमान निसर्गात उपलब्ध असलेल्या पानांनी वृक्षाच्या सालींनी स्वत:चे शरीर झाकतात. तात्पर्य वस्त्र परिधान करणे हे माणसाचे इतर प्राण्याहून आगळे असे अनितरसाधारण वैशिष्ट्य आहे. मानवाच्या प्रकृतीकडून संस्कृतीकडे जाणाऱ्या प्रवासाचे वस्त्र हे प्रतीक आहे.

सर्व प्रसाधनात कालदृष्ट्या वस्त्र हे सर्वप्रथम ठरते. कारण इतर प्रसाधनापूर्वी वस्त्राचा जन्म झाला. ती माणसाची मूलभूत गरज असली तरी संस्कृतीच्या विकासासोबत वस्त्राला शोभेचे, अलंकरणाचे स्थान मिळाले असावे. कालिदासाचा प्रसिद्ध टीकाकार मल्लीनाथाने त्याला‘परिधेय’ असे म्हटले आहे.

वस्त्र, वास, परिधान, वेष असे अनेक पर्यायी शब्द परिधेयासाठी आहेत. व्यवहारात आपण वस्त्रालंकार असा शब्दप्रयोग करतो. म्हणजेच वस्त्राला आपण अलंकाराला सोबत स्थान दिले आहे किंवा वस्त्रच अलंकार आहेत असाही त्याचा अर्थ होतो.

अलंकाराने जसे सौंदर्य खुलते तसेच ते वस्त्रानेही खुलते म्हणूनच ‘एक नूर आदमी दस नूर कपडा’ ही म्हण हिंदीत प्रसिद्ध आहे. एका संस्कृत सुभाषितकाराने वस्त्राचा महिमा पुढील शब्दांत गायिला आहे

वास: प्रधानं खलु योग्यताया:
वासोविहीनं विजहाति लक्ष्मी:।
पीताम्बरं वीक्ष्य ददौ  तनुजां
दिगम्बरं वीक्ष्य विषं समुद्र: ।।१

तुमच्या कपड्यावरून लोक तुमची योग्यता ओळखतात म्हणूनच समुद्राने पितांबरधारी विष्णूला आपली कन्या लक्ष्मी दिली तर वस्त्रहीन अशा शंकराला पाहून आपल्या जवळील विष त्याला दिले.

वरील श्लोकातील गमतीचा भाग सोडला तरी वस्त्रप्रसाधन आपल्या व्यक्तिमत्त्वाचा भाग आहे हे नक्की. आपल्या प्रतिष्ठेचे ते प्रतीक असते. वस्त्रावरून माणसाचा प्रदेश, धर्म, व्यवसाय, आर्थिक परिस्थिती याचाही अंदाज येतो. अशा या वस्त्रप्रसाधनाचा संस्कृत साहित्यातील मागोवा घेऊ.

**वेदवाङ्मय** - वेद हा मानवाचा आद्य प्रातिभ आविष्कार. मानवी सभ्यतेच्या पहिल्या वहिल्या पाऊलखुणा वेदात आढळतात. वेदांचा काळ साधारणत: इ.स. पूर्व ५०००ते ६००० वर्षापूर्वीचा मानला जातो. भारतीय संस्कृती आणि परंपरांचे प्रतिबिंब आपल्याला वेदात आढळते. त्यामुळे भारतीयांच्या वस्त्रालंकाराचा शोध घेण्यासाठी सर्वप्रथम आपल्याला वेदवाङ्मयाकडे वळावे लागते आणि लक्षात येते की भारतीयांच्या वस्त्रालंकाराच्या आवडीचे मूळ थेट वेदात सापडते.

वस्तुत: वेद हे इतिहासग्रंथ नाहीत पण यज्ञाच्या निमित्ताने प्राचीन ऋषिमुनींनी रचलेल्या ऋचातून इ.स.पूर्व पाच-सहा हजार वर्षापूर्वीच्या भारतीय आर्यांच्या समृद्ध आणि विकसित परंपरेचा मागोवा घेता येतो.

वेदातील ऋचातून अनेक वेळा वस्त्रांचा उल्लेख येतो. वस्त्रांचा उपयोग प्राचीन भारतीयांनी मूलत: देहाचे थंडी, वारा इत्यादी नैसर्गिक परिस्थितीपासून रक्षण करण्यासाठी वस्त्राचा वापर सुरू केला तरी योग्यप्रकारे वस्त्राप्रावरण परिधान करणे आवश्यक मानले गेले. ऋग्वेदातील अनेक ऋचावरून हे स्पष्ट होते.

एके ठिकाणी विश्वामित्र ऋषी म्हणतात –

‘‘युवा सुवासाः परिवीत आगात सउ
श्रेयान भवति जायमानः।[१]

सुंदर वस्त्र परिधान केलेला युवक आला आहे तो प्रकट होताच (दिसताच) कल्याणकारक वाटतो. एके ठिकाणी महर्षी अंगिरस म्हणतात, ‘‘हे अश्विन, यज्ञ करणारा जो तुझी पूजा करतो. त्याला तू वस्त्राच्छादित वधूप्रमाणे यश आणि मांगल्य प्रदान करतो.’’[२]

**वस्त्रांची प्रसंगानुकूलता –**

मांगल्यासोबत सामाजिक, धार्मिक प्रसंगानुसार,आर्थिक सुबत्तेनुसार वेदकाळी वस्त्र धारण करीत. जसे की वैदिक ऋचांमध्ये इंद्राचे वर्णन करतांना त्याला सुवर्णखचित वस्त्रामध्ये चित्रित केले आहे. [३] यज्ञ करणारे लोक विशेष प्रकारचे वस्त्र धारण करीत तर त्यांच्या स्त्रिया कुशापासून बनविलेले वस्त्र धारण करीत. विवाहादी प्रसंगात किंवा उत्सवात विशेष वस्त्रांना परिधान करण्यात येई.

चमकदार आणि पांढऱ्या वस्त्रांचे वेदकाळी अधिक आकर्षण असावे असे वाटते. उषादेवतेच्या वर्णनात महर्षि अंगिरस म्हणतात, ‘ही द्योची कन्या, शुभ्रवस्त्र धारण करणारी युवती (उषा) अंधार दूर करीत आहे.’

एषा दिवो दुहिता प्रत्यदर्शी व्युच्छन्ती युवतिः शुक्रवासाः।[४]

विश्वामित्राने तिला शुभ्रवस्त्रधरा ‘‘वस्त्राण्यर्जुना वसाना’’[५] म्हटले आहे.ऋग्वेदात वरुणाला स्वर्णमय द्रापि आणि इंद्राला सोनेरी अत्क धारण करणारा म्हटले आहे. यावरून असे लक्षात येते की त्याकाळी सुवर्णखचित वस्त्र निर्माण केल्या जात होते. त्याचा उपयोग श्रीमंत लोक किंवा राजेमहाराजे करीत असे. सुंदर कलात्मक मूल्यवान वस्त्र भूषण म्हणूनच परिधान केले जाते. वेदातील देवतांच्या स्तूतीवरून त्यांचे जे चित्र वैदिक ऋषींनी उभे केले आहे त्यावरून त्याकाळच्या भरजरी उंची वस्त्रांचा अंदाज

येतो अर्थात ही वस्त्रे मूलभूत गरज म्हणून नव्हे तर अलंकरण म्हणून धारण केले जात.

वैदिक संस्कृतीच्या सुरुवातीच्या काळात वस्त्रांचा उपयोग अलंकरणच्या ऐवजी सुरक्षेच्या दृष्टिकोनातून अधिक होत असे पण जसजसी संस्कृती संपन्नतेकडे जाऊ लागली. वस्त्र हे विलासी जीवनाचा भाग म्हणून त्याकडे पाहण्यात येऊ लागले.

ऋग्वेदातील देवदेवतांच्या वर्णनात त्याकाळातील संपन्न समाज, राजेमहाराजे सुवर्णखचित वस्त्र वापरत असावे असे दिसते. मात्र सामान्य जनांच्या वस्त्राची माहिती आपल्याला अथर्ववेदात आढळते.

'स्त्रियांचे सौंदर्य वस्त्रानेच खुलते' असे या अथर्ववेदात म्हटले आहे.[६] म्हणजे वस्त्र हे ही प्रसाधन आहे, सौंदयवर्धक आहे की कल्पना वेदातच रूजलेली होती.

त्वष्टाने वस्त्र निर्माण केले आणि ते कल्याणासाठी आणि सुखासाठी आहे अशी समजूत वेदकाळी होती.[७] (त्वष्टा वासो व्यदिधाच्छुमेका।) याशिवाय अथर्ववेदातील काही मंत्रावरून त्याकाळी असलेल्या वस्त्रविषयक पुढील लोकसमजूतीवर प्रकाश पडतो.

(१) पुरुषाने स्त्रिची वस्त्रे कधीही वापरू नयेत.

(२) विवाहातील वधूचे वस्त्र ब्राह्मणास दान द्यावे असे वस्त्र दान केल्याने अंथरूणावरील राक्षसांचा (संसर्गजन्य जीवजंतू इ.) यांचा नाश होतो अशी श्रद्धा त्याकाळी होती.
देवैर्दत्तं मनुना साकमेतद्वाधूयं वासो वध्वश्च वस्त्रम्।
यो ब्रह्मणे चिकितुषे ददाति स इद्रक्षांसि तल्पानि हन्ति।।[८]

(३) नववधूने दीक्षाव्रताचे पालन करावे ही दीक्षा म्हणजे स्वत: सूत काढणे आणि वस्त्र विणणे होय.[९]

(४) स्त्रियांनी पतीचे वस्त्र स्वत:च विणावे.[१०]

सूक्तकर्ते ऋषी म्हणतात स्त्रियांनी घरात सूत काढावे, ताणे तयार करावे, कापड्याच्या दशांना पीळ भरून गाठी द्याव्यात विणण्याचे कार्य

करावे. ते घरातील सर्व स्त्रियांनी एकत्र येऊन करावे. दीर्घायुष्य प्राप्त करणाऱ्या स्त्रिने हे वस्त्र परिधान करावे.[११]

देवी: अकृन्तन् तत्निरे अभित: अन्तान् ददन्त अवयन्।
सं व्ययन्तु आयुष्मती इदं वास: परिधत्स्व।।[१२]

त्याकाळी वस्त्रांना काठ, झालरी इ. असे जे वस्त्र स्त्रियांच विणत, ते शरीरास सुखस्पर्श करणारे व्हावे अशी प्रार्थना ऋषींनी केली आहे.[१३] यावरून त्याकाळी वस्त्र विणण्याची कला प्रगत झाली असावी असे दिसते. दीक्षाव्रतामुळे कुटुंबाची गरज भागविण्यापुरती वस्त्रनिर्मिती स्त्रिया घरोघरी करीत त्यामुळे एखाद्या कुटीरोद्योगासारखे स्थान वस्त्र निर्मितीला लाभले असावे. पन्नास वर्षापूर्वी कुटुंबाला आवश्यक तेवढे पिठ घरोघरी दळण्यात येत असे. तसेच हजारो वर्षापूर्वी प्रत्येक कुटुंब आवश्यक ती वस्त्रप्रावरणे स्वत: बनवित. अर्थात वस्त्रप्रावरणाच्या बाबतीत वैदिक समाज स्वावलंबी होता असे म्हणण्यास प्रत्यवाय नसावा.

वस्त्राविषयी प्रार्थना करताना ऋषी म्हणतात-''ज्यांचे काठ पदर तसेच उभे-आडवे दोरे, ताणेबाणे आम्हास सुख देणारे होत. जे वस्त्र आमच्या स्त्रियांनी विणले आहेत तेच आम्हास सुखस्पर्श देणारे प्रतीत होवो.

ये अन्ता: यावती: सिचो य ओतवो ये च तन्तव:।
वासो यत्पत्नीभिरुतं तन्न स्योनतुपस्पृशात् ।।[१४]

वेदकाळी स्त्रियांच्या वस्त्राचे तीन प्रकार होते. काठाचे वस्त्र (आशंसनम्), डोक्यावरून पदर घेण्याचे वस्त्र (विशंसनम्) आणि सर्वांग लपेटून घेण्याचे वस्त्र(अधिविकर्तनम्) असे ते तीन प्रकार होते.[१५] विविध रंगाची वस्त्रे वापरल्याने स्त्रियांच्या रूपात विशेष शोभा उत्पन्न होते अशी भावना होती[१६]

स्त्रियांनी पतीचे वस्त्र स्वत: विणण्यामागे काय भावना होती याचे स्पष्टीकरण पुढील मंत्रात मिळते.

अभि त्वा मनुजातेन दधामि ममवाससा।
यथासो मम केवलो नान्यासां कीर्तयाश्चन।।[१७]

अर्थ – मी विचारपूर्वक विणलेल्या वस्त्राने तुला बांधून ठेवते.ज्यायोगे तू केवळ माझाच होऊन रहा आणि अन्य कोण्या स्त्रिचे नाव घेणारा होऊ नको.

सकाळी उठून नवीन, उज्ज्वल उत्तम वस्त्रे नेसल्याने व्यक्तिमत्व प्रसन्न वाटते याची जाणीव वैदिक आर्यांना होती हे पुढील मंत्रावरून दिसून येते.

नवं वसान: सुरभि: सुवासो उदागां जीव उषसो विभाती:।[१८]

नवे वस्त्र नेसून सुंगधी वस्तू धारण करून उत्तम वस्त्र नेसणारा उष:काली जागृत झालेला जीव शोभिवंत दिसतो.

या उदाहरणावरून हे लक्षात येते की योग्यप्रकारे वस्त्र परिधान करणारी व्यक्ती (युवक) समाजात प्रतिष्ठित, श्रेयस्कर मानली जाई. तसेच वस्त्रांनी सजलेल्या तरुण स्त्रियांना यश आणि मांगल्यप्रदान करणाऱ्या म्हणून समाजात स्थान होते. अर्थात यावरून वस्त्र धारण करण्याचा हेतू शालीनता, मंगलता आणि प्रतिष्ठा हा होता असे लक्षात येते.

शतपथ ब्राह्मणात एक मंत्र आहे. त्यात वस्त्राचा विभिन्न घटकात विभिन्न देवता वास करतात असे म्हटले आहे.[१९] ह्या मंत्रानुसार बाण्याची(आडवे धागे) देवता, अग्नि आहे (अग्ने: पर्या सो) ताण्याची (उभे धागे) देवता वायू (वायो: अनुखादी) नीवीची (नाडा) देवता पितृ प्रजाताची नाग, सूताची (तन्तू) विश्वदेव तसेच अलंकारांची देवता (आरोक) नक्षत्र आहेत. हीच कथा तैतीरीय संहितेत आली आहे.[२०] यावरून वस्त्राला देवनिर्मित मानल्याने त्यात पवित्रतेचा भाव आला आणि धार्मिक विश्वासाशी वस्त्र जोडल्या गेले.

पूजापाठ, यज्ञयाग करतांना वैदिक आर्य प्रारंभी चामड्याचे, लोकरीचे तसेच कौशेयवस्त्र धारण करीत जसजसे आर्यांची वसती मैदानी प्रदेशाकडे पसरू लागली थंडी कमी होत गेल्याने भौतिक परिस्थितीत बदल झाल्याने वस्त्रातही बदल होऊ लागला. चामडे, लोकर

वापरणे त्रासदायक होऊ लागले त्यामुळे दूर्श, क्षौम इत्यादी तलम वस्त्रे उपयोगात येऊ लागले. ह्या वस्त्रासोबत शरीराला सजवणे, अलंकृत करणे आणि शालीनता हा भाव त्यात येऊ लागला. रेशमी वस्त्रांचा प्रघात त्याकाळापासून आजतागायत सुरू आहे.

**आर्ष महाकाव्ये –**

रामायण, महाभारत ही दोन महाकाव्ये आर्षमहाकाव्ये प्रसिद्ध आहेत. ही दोन्ही महाकाव्ये त्या काळच्या इतिहास आहे. रामायणाचा काळ त्रेतायुगातील आहे. रामायणाच्या काळाबाबत विद्वांनामध्ये मतमतांतरे असली तरी नासाने काढलेल्या रामसेतूच्या छायाचित्रावरून त्यांच्या मते रामायणाचा काळ इ.स.पूर्व १८४०० वर्षांचा ठरतो. त्या काळातील सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक, आर्थिक, लोकजीवनाचे चित्रण या महाकाव्यात आढळते. त्यातून त्या काळातील वस्त्र, अलंकार, प्रसाधन यावर पुरेसा प्रकाश येतो. सर्वप्रथम आदिकाव्य रामायणाचा या दृष्टिकोनातून परामर्श घेऊ.

**राजवस्त्र** –त्याकाळी राजेलोक नेहमी सुवर्णतंतू निर्मित आणि रत्नखचित अशी महागडी वस्त्रे धारण करीत. राम किंमती वस्त्रे धारण करीत असे.[२१] अशा वस्त्रांना ''महाराजत वासस'' म्हटल्या जाई. सोनेरी धाग्यांनी निर्मित पिवळ्या (पीतं कनपट्टाभं) आणि रत्नखचित (नगासक्त) असा वस्त्रांचा उल्लेख रामायणात सापडतो.[ळ] अशी वस्त्रे धारण केलेल्या शोभिवंत रामाला जेव्हा दण्डकारण्यातील मुनींनी पाहिले तेव्हा ते चकित झाले. [२२]

त्याकाळी पूजापाठ इ.धार्मिक प्रसंगी क्षौम वस्त्रांचा (रेशमी) अधिक उपयोग करीत क्षौम वस्त्र धारण केलेली कौसल्या रामाच्या राज्याभिषेक प्रसंगी देवालयात पूजा करीत होती.[२०] नववधू सीतेचे राजवाड्यात आगमन झाले त्या प्रसंगी दशरथाच्या सर्व राण्यांनी क्षौम वस्त्र धारण केले होते. [२३] मंगल प्रसंगी बहुतेक क्षौम वस्त्र धारण करीत. यावरून त्याकाळी क्षौम वस्त्राला पावित्र्याचा मान होता. आश्वलायन श्रौतसूत्रात याज्ञिकाला दक्षिणेत

क्षौमवस्त्र देण्याचा उल्लेख आहे.[२४] अंत्येष्टि क्रियेसमयी रावणाचे शव क्षौमवस्त्रात लपेटल्याचा उल्लेख आहे[२५]

यावरून क्षौम वस्त्र प्राचीन काळापासून प्रचलित होते. क्षौम वस्त्र हे क्षुमा किंवा अतसीच्या (जवसाच्या)धाग्यापासून बनवत.

क्षौमाशिवाय कौशेय अथवा रेशमी वस्त्राचे प्रचलन राजपरिवारात दिसून येते. राण्या सुंदर वस्त्रांनी सुसज्ज असायच्या. राजा दशरथाचे अंत:पुर'अग्रवेश प्रमदाजनाकुल'[२३] होते. रावणाच्या अंत:पुरातही रंगीत वस्त्र आणि माळा धारण केलेल्या नटलेल्या हजारो सुंदर स्त्रिया होत्या.[२६]

**मुनिवस्त्र** – अजिन म्हणजे मृगचर्म. वल्कल आणि कुशचीर यांना मुनीवस्त्र म्हटले जाई. विद्यार्थी दशेत ब्रह्मचारी केवळ एक वस्त्र गुंडाळून राहात असे.[२७]

**गृहस्थाश्रमी** – गृहस्थाश्रमी पुरुष अधोवस्त्र आणि उत्तरीय अशी जोडी धारण करीत असे. कामाच्या वेळी उत्तरीय अधोवस्त्रावर, कमरेला बांधले जात.[२८] आर्य आणि अनार्यांच्या वेषात फरक असावा कारण इल्व नावाचा राक्षस सुसंस्कृत भाषा बोलून ब्राह्मणासारखा वेश धारण करीत असे.[२९]

रावणाने सीतेचे हरण करताना संन्यासाचा वेष धारण केला होता. म्हणजे संन्यासाचा विशिष्ट वेष असे. रामायणात राक्षसासाठी 'रक्ताम्बरा' 'रक्तवासस:' अशी विशेषणे वारंवार येतात यावरून राक्षसांना लाल रंग अधिक प्रिय असावा असे वाटते.

**विवाहित स्त्रियांचे वेष** –स्त्रिया देखील वस्त्रांची जोडी धारण करीत एक कमरेवर नेसायचे अधोवस्त्र आणि दुसरे अंगावर धारण करायचे उत्तरीय. रामायणात त्याला स्तनोत्तरीय किंवा स्तनांशुक असेही म्हटले आहे. सीतेने आपले उत्तरीय ऋष्यमुख पर्वतावर टाकले आहे असा उल्लेख रामायणात आहे.[२८] त्यामुळे सीतेजवळ केवळ अधोवस्त्रच राहिले होते अधोवस्त्र हे आजच्या साडीसारखे नसे तर केवळ नेसूचे वस्त्र असे त्यामुळे उत्तरीय पदरासारखे किंवा ओढणीसारखे वापरत असत. तलम वस्त्रे (सूक्ष्म वस्त्र) किमती वस्त्र (महार्ह वस्त्र) नक्षीकाम केलेले वस्त्र (संवीत) कौशेय, दुकुल,

कनकपट्ट, रत्नांबर इत्यादी नावावरून रामायणकाळी वस्त्रोद्योग भरभराटीला आला असावा असे वाटते.

त्याकाळी तुलनेने पुरुष रंगीत वस्त्रांचा उपयोग कमी करीत पण स्त्रिया रंगीत वस्त्र धारण करीत. अशोक वाटिकेत राहून सीतेचे अधोवस्त्र जीर्णक्षीर्ण झाले होते पण त्याची शोभा आणि रंग यथावत कायम होते.[३०] (ते विटले नव्हते)

रामायणात आर्यांचे वस्त्र कापसापासून बनविण्याचा उल्लेख नाही मात्र लंकेत हनुमानाच्या शेपटीला कापसाचे जुने जीर्ण कपडे गुंडाळले असा उल्लेख आहे.[३१] राक्षस चर्मवस्त्र धारण करत असल्याचा उल्लेख रामायणात मिळत नाही. कापूस, विविध रेशमी वस्त्रासोबत सुवर्णतंतूनी निर्मित वस्त्रांचा प्रयोग ते करीत. रावण देखील सोनाच्या जरीने निर्मित वस्त्र धारण करीत असे. रावण सोन्याच्या तारांनी विणलेले वस्त्र धारण करीत असे.[३२] अगदी पन्नास वर्षापूर्वी देखील भारतातील स्त्रियांच्या वस्त्रसंग्रहात सोन्याचे जरीकाम केलेली पातळे असत.

**महाभारतकालीन वस्त्र –**

महाभारताचा काळ हा द्वापार युगाचा समजल्या जातो. म्हणजे सुमारे इ.स. पूर्व पाच हजार वर्ष हा महाभारताचा काळ मानायला हरकत नसावी. साहजिक प्रसाधनात कालपरत्वे दिसून येणारी प्रगती महाभारतात लक्षात येते.

महाभारतात समापर्वात देवसभेचे वर्णन आले आहे. त्यात सर्व देवांना सुंदर किमती वस्त्राभरणाने सजलेले चित्रित केले आहे.[३३]

राजसूय यज्ञप्रसंगी महाराज युधिष्ठिराला भेट म्हणून मिळालेल्या वस्तुंमध्ये वस्त्रालंकाराचे प्रचलित प्रकार आणि त्यांच्या निर्मिती कलेचा परिचय घडतो.[३४] त्याच सभेत आदित्यगण तसेच राक्षसाचेही असेच दिव्यालंकार आणि वस्त्रपरिधान केल्याचे वर्णन आहे.[३५]

लंकेहून बिभीषणाने घटोत्कचाच्या हातून युधिष्ठिरासाठी बहुमूल्य मुकुट, स्वर्ण कुंडल, सुवर्णफुल, सोन्याची माळ (रुक्म) प्रसिद्ध चंदन, रत्न तसेच नाणी, बहुमूल्य कम्बल, वस्त्र इत्यादी पाठवले होते.[३६]

कंबोज देशाहून लोकर, लांडग्याच्या केसापासून बनवलेले सुवर्णवस्त्र, गरम चादर आणि श्रेष्ठ चामडे भेटीदाखल आले होते.[३७]

पारसिंधू देशातील लोक कंबल, मेंढ्यापासून कमावलेले चामडे घेऊन आले होते. मलय तसेच दर्दुर पर्वत प्रदेशातील राजे सुवर्णघटात चंदनाचा रस. तसेच चंदन आणि अगरूच्या विविध वस्तूचे उपहार घेऊन आले होते.[३८]

चोल आणि पाण्ड्य देशाचे राजे चमचमते हिरे रत्ने, सोने आणि उंची वस्त्रे घेऊन आले.[३९] आजच्या सारखे त्याकाळी देखील उत्सव प्रसंगी वस्त्रे (अहेर) भेट देण्याची पद्धत होती.

**वेषवैविध्य** –त्याकाळी वर्णानुसार, आश्रमानुसार वेषभूषा धारण केली जात असे. शस्त्रास्त्र चालविण्याचे धडे घेणारे किंवा क्षत्रिय मृगाजिन धारण करीत. ब्रह्मचारी स्नातक हाच वेष घालीत. किरादाती जमाती चर्मवस्त्र धारण करीत. राजे महाराजे स्वर्णखचित मूल्यवान वस्त्र परिधान करीत असत.

**नोकरवर्गाचा वेष** –महाभारतात धूतप्रसंगी युधिष्ठिर सांगतो. 'माझ्याजवळ एक लाख तरुण दासी आहेत.' त्यांच्या वर्णनावरून त्या उत्तम वस्त्रे परिधान करीत असे लक्षात येते.[४०]

**अश्वघोष** – (इ.स. पहिले शतक.)

अश्वघोषाने आपल्या साहित्यात अंशुक, दुकुल, कौपिन इ. वस्त्राचा उल्लेख केलेला आहे. त्याने सीतांशुक,नीलांशुक, तन्वंशुक, पाण्डुरांशुक अशा विविध रंगाच्या अंशुकाचा उल्लेख केला आहे.[४१] त्याकाळी चीन देशातून आयात होणाऱ्या वस्त्राला चिनांशुक असे म्हणत.

दुकुलाचा उल्लेख जवळपास सर्वच संस्कृत साहित्यात येतो तसा अश्वघोषाने केला आहे. काही विद्वानांच्या मते दुकुल हे वृक्षाचे नाव

असून त्याची साल कुटून त्याच्या तंतूपासून बनविलेल्या वस्त्राला दुकुल असे म्हणत असत.[४२]

'दुकुलाच्या पदराकडे लक्ष न देता सुंदरी वेगाने जिन्यावरून वर चढली'[४३] असा अश्वघोषाने दुकुलाचा उल्लेख केला आहे. कौपिनम् हे एक प्रकारचे वस्त्र होते जे लंगोटीसारखे अधोवस्त्र होते. तर उत्तरीय अंगावर घेणाऱ्या चादरीसारखे मोठे वस्त्र होते. सौन्दरानन्द महाकाव्याच्या श्लोकात उत्तरीयाचा उल्लेख आला आहे.[४४] अश्वघोषाच्याकाळी स्त्रिया रंगीबेरंगी वस्त्र धारण करीत. कोणी कमळासम लाल वस्त्र, तर कोणी पिवळे वस्त्र नेसली होती असे वर्णन त्याच्या महाकाव्यात येते.[४] अश्वघोषाने एके ठिकाणी म्हटले आहे की,''गौतम बुद्धांच्या जवळ नीलकमलासारखी वस्त्र नेसलेली शुभ्र शंखाप्रमाणे बाहू असलेली गोपराजकन्या आली.[४६]

त्याकाळी वस्त्रांना गाठी मारून ते परिधान करीत अश्वघोषाने झोपलेल्या स्त्रियांचे वर्णन केले आहे. ज्यांच्या वस्त्रांच्या गाठी सुटलेल्या होत्या.[४७] कदाचित स्त्रिया गाठीच्या चोळ्या घातलेल्या असाव्यात. राजेमहाराजे बहुमूल्य वस्त्र धारण करीत. त्यांचे वस्त्र सोनेरी नक्षीकाम केलेले असे. त्यात हंसाच्या चित्राचे प्रचलन होते असे दिसते. कारण राजकुमार बोधिसत्वाच्या वस्त्रांवर सुवर्णमय हंसाचे चिन्ह अंकित होते.[४८] बोधिसत्व जेव्हा काषाय वस्त्र धारण करून वनात राहू लागला तेव्हा त्याची पत्नी यशोधरा विलाप करीत म्हणाली,'' बहुमूल्य वस्त्र, धूप, चंदनाचे सेवन करण्यास योग्य असे त्यांचे शरीर मनात थंडी, ऊन, पाऊस कसा बरे सहन करेल?[४९] त्याकाळी भिक्षुक काषाय वस्त्र धारण करीत - तपस्वी वल्कल आणि चीर वस्त्र धारण करीत. ऋतुमानानुसार लोक विविध वस्त्र धारण करीत.

**अर्थशास्त्र (इ.स. पूर्व ३-४ शतक) -**

आचार्य कौटिल्याचा अर्थशास्त्र हा ग्रंथ जरी राजनितिविषय असला तरी त्यातून तत्कालीन वस्त्रप्रावरण, अलंकार आणि प्रसाधन सबंधित विषयावर आनुषांगिक प्रकाश पडतो. राज्य सुदृढ आणि स्थिर बनविण्यासाठी राज्याचा कोष अत्यंत महत्वपूर्ण असतो. कोषात जमा करण्याच्या ज्या किंमती वस्तूमुळे राज्याला कर मिळतो; त्यात वस्त्र, अलंकार निर्मितीसाठी वापरण्यात येणारा कच्चा माल आणि सुगंधित वस्तू यांना विशेष महत्त्व दिले आहे. यावरून या वस्तूंचे त्याकाळी अत्यधिक प्रचलन होते आणि सरकारी तिजोरीत करापासून यामुळे फार मोठी भर पडत असावी असे दिसते.

त्याकाळी वस्त्रांचे तीन प्रकार होत.(१) चर्मवस्त्र (२) लोकरी (३) रेशमी अर्थशास्त्रात रेशमी वस्त्रातच कापसाच्या/सुती वस्त्रांचा समावेश केला आहे. विविध कपड्याची नावे, त्यांचे वैशिष्टये लांबी, रूंदी, रंगरूप त्याचे उत्पत्ती स्थान याचे वर्णन अर्थशास्त्रात विस्ताराने आले आहे. [५०]

**(१) चर्मवस्त्र -**

चामड्याच्या विविध प्रकारही कौटिल्याने कथन केले आहे. त्यात कान्तनावक, प्रेयक, विसी, महाविसी, श्यामिका, कालीका, कदली, चन्दोत्तरा, शाकुला, सामूर, चीनसी, सामूली, सातिना, नलतूला, वृत्तपृच्छा इत्यादी नावे आली आहेत. यावरून त्याकाळच्या चर्मोद्योगाच्या भरभराटीची कल्पना येते. [५१]

**(२) लोकरी वस्त्र -**

लोकर मुख्यत: मेंढ्यापासून काढली जायची. क्वचित हरिणाच्या केसापासून ही बनवत लोकरी वस्त्रावर कशिदाकारी होत असे. कधी कधी विणकाम करतांना त्यात विविध आकार/नक्षीकाम होत असे कधी वेगवेगळे तुकडे जोडून(खण्ड संघात्य patch work) तर कधी जाळीदार (तन्तु विच्छिन्न) लोकरीवस्त्र त्याकळी विणले जात असे. [५२]

कांबळे, वारबाण (कोट) वर्णक (रंगीतवस्त्रे) तालच्छद (अंथरूण) इत्यादी लोकरीची वस्त्रे तयार होत असल्याचा उल्लेख अर्थशास्त्रात येतो. पावसाळ्यात वापरण्यासाठी आठ तुकड्यांचे अपसारण बनविले जात.[५३]

संपुटिका चतुरश्रिका, लम्बरा, कटवानक प्रावरक, सतलिका इत्यादी हरणाच्या केसापासून बनविलेले विशेष वस्त्र त्याकाळी प्रचलित असावीत. [५४] मनुष्यासाठी नव्हे तर हत्तीच्या पाठीवरील झूल, 'कौचपक' घोड्याच्या पाठीवरील बैठक 'तुरगास्तरण' इत्यादी वस्त्रही विशेष बनविले जात.[५५]

**(३) रेशमी वस्त्र –**

पत्रोर्ण या पत्राच्या रेशांनी तंतूनी बनलेले रेशमी वस्त्रांचा उल्लेख पण अर्थशास्त्रात आला आहे. पत्रोर्ण तीन प्रकारचे होते – मागधिक, पौण्ड्रिक आणि सौवर्णकुड्यक. नागवृक्ष, लिकुच, बकुल आणि वटवृक्ष त्याचे उत्पत्ती स्थान होते. यापासून बनलेले वस्त्र क्रमश: पिवळे, गोधूम, श्वेत आणि नवनीत रंगाचे होते. [५६] कौशेय आणि चीनपट्ट वस्त्रांचे उल्लेखही कौटिल्याने केले आहे. पांड्य, कोंकण, कलिंग, कासी, वंग, वत्स आणि महिषक (म्हैसूर) या प्रदेशातील कापसाचे वस्त्र श्रेष्ठ मानले जात.[५७]

**कामसूत्र** –(इ.स. पहिले शतक)

कामसूत्र वर्णिलेल्या ६४ कलांमध्ये तीन कला वस्त्रसंबंधित आहे. पहिली कला नेपथ्यप्रयोग, दुसरी वस्त्रगोपनानि, तिसरी वस्त्ररंजन.

कामसूत्राच्या टीकाकाराने, यशोधराने म्हटले आहे की देशकालानुरूप वस्त्र, माल्य, आभरण इत्यादी द्वारा शरीराला अलंकृत करणे म्हणजे नेपथ्यप्रयोग.[५६] येथेही आभूषण माल्य इत्यादी सोबत वस्त्रालाही शरीराचे अलंकरण मानले आहे.

वस्त्रांशी संबंधित दूसरी कला म्हणजे वस्त्रगोपनानि. यशोधराच्या व्याख्येवरून ती वस्त्रधारण कला असावी असे वाटते. जसे आजही विविध प्रांतात साडी नेसण्याची एक विशिष्ट पद्धत आहे. नऊवार किंवा पाचवार

साडी नेसल्यावर तिच्या रुंदी किती लक्षात येत नाही यशोधर म्हणतो ''मोठ्या वस्त्राला नेसून छोटे करणे आणि असलेल्या अवयवांना असे वस्त्राने झाकायचे की असूनही ते दिसायला नको.[५८]

याशिवाय वात्सायनाने 'दशनवसनराग:' ह्या कलेत वस्त्र रंगविण्याच्या कलेचाही समावेश केला आहे.

**नाट्यशास्त्र** -(इ.स. पूर्व पहिले ते दुसरे शतक)

भरत मुनीनीही वस्त्राचा समावेश अलंकरणात केला आहे. त्यांनी पात्राने भूमिका, देश, जाति यांना अनुसरून वेषभूषा करावी असे सांगितले आहे.[५९] त्यासाठी अवन्ती, गौड, आभीर पूर्वोत्तर आणि दाक्षिणात्य स्त्रियाद्वारा केल्या जाणाऱ्या वेषांचा उल्लेख केला आहे. याचा अर्थी वर उल्लेखिलेल्या प्रदेशात स्त्रियांचे वेष वेगवेगळे होत असे लक्षात येते. याशिवाय भरतमुनींनी वस्त्राचे धारण करण्याच्या पद्धतीवरून निबन्धनीय, प्रक्षेप्य आणि आरोप्य हे तीन प्रकार सांगितले आहेत.[६०]

भरतनाट्यम् सारख्या पारंपारिक नृत्य प्रकारातील वेशभूषाही तत्कालीन वेशभूषेप्रमाणे असावी असे म्हणावयास हरकत नसावी.

**कालिदास** - (चौथे शतक)

**प्रसंगानुकूल वेष** - कालिदासाच्या काळी प्रसंगानुकूल वेष धारण करण्याची पद्धत होती. विवाहादी प्रसंगी उज्ज्वल वेष (कुमारसंभवम्/ सर्ग ७), पार्वतीचा तपस्यावेष (सर्ग५) कुमार कार्तिकेयाचा युद्धवेष (सर्ग१३) दुष्यतांचा मृगयावेष (शाकुंतल/ अंक (२) आश्रमातील तापस कन्येचा वल्कलवेष (शाकुंतल/ अंक १) असे विविध प्रसंगी वेगवेगळे वेष धारण करीत. कालिदासाच्या मते वेशभूषेचा उद्देश प्रियजनाला प्रसन्न करणे हा होता. म्हणूनच विवाहाप्रसंगी सुंदर वस्त्रानी नटलेल्या पार्वतीला उद्देशून त्याने म्हटले आहे -'स्त्रीणां प्रियालोकफलो हि वेश:।'[६१]

**ऋतुकालोचित वेशभूषा** - भारतात स्थूल मानाने आपण तीन ऋतू मानतो. हिवाळा, उन्हाळा, पावसाळा. त्यामुळे आज जसे ऋतुनुसार वस्त्रपरिधान करतो तशीच वस्त्रभूषा त्याकाळी होती. उन्हाळ्यात स्त्रिया जाडे वस्त्र

उतरवून (विमुच्य वासांसि गुरूणि) (तन्वंशूक) तलम रेशमी वस्त्रे धारण करीत.[६२] वर्षा ऋतूत तलम आणि पांढरे वस्त्र (प्रतनुसित दुकूल) धारण करीत.[६३] शरद ऋतूतही हलकी थंडी सुरू होते. पावसाळा संपला असतो. या दिवसात स्त्रिया आपल्या वेषात विशेष बदल करीत नसत पण हेमंत ऋतूत नितंबावर रेशमी वस्त्र आणि स्तनावर तलम वस्त्र बांधत असत. तर कडक थंडीच्या शिशिर ऋतूत अंगभर जाडे कपडे घालत.[६४] स्त्रिया कापसाच्या वस्त्राचे स्तनावरण घालीत आणि रंगीत रेशमीचे वस्त्र अधोभागी नेसत. [६५] मनोज्ञकूर्पासक पीडित स्तना: सरागकौशेयक भूषितोरवा:।[६६]तर पावसाळ्यात हलक्या पिवळ्या रंगाचे वस्त्र धारण करीत विशेषत: केशरी रंगाचे वस्त्र आणि लालसर रंगाचे तलम कपड्याची चोळी धारण करीत.[६७]

**बाणभट्ट** –(सहावे शतक)

गुप्तकाळानंतर सम्राट हर्षवर्धनाचे साम्राज्य स्थापित झाले. हर्षवर्धनाचा राजकवी बाणभट्टाच्या रचनेत त्याकाळच्या समाजातील लोकांच्या वेषभूषेचा परिचय घडतो. बाणभट्टाने ‘हर्षचरितम्’ समकालीन राजाचे चरित्र लिहिल्यामुळे त्यातील सर्व पात्र त्या काळातील होती. बाणाच्या रचनांच्या अभ्यासानंतर आपण या निष्कर्षात पोचतो की गुप्तकालीन समाजाची वस्त्रोलंकाराविषयी जी धारणा होते तीच हर्षवर्धनाच्या काळी आढळते.

**नागरिकांची वेषभूषा** –

चंद्रपीडाला पाहण्यासाठी आलेल्या स्त्रियांच्या धांदलीचे वर्णन करताना वस्त्रालंकाराचे उल्लेख आले आहे त्यात उत्तरीय, अधोवस्त्र, रेशमी उत्तरीय इत्यादी वस्त्रांचा उल्लेख आहे[६८] दघीचीची सखी मालतीच्या वर्णनावरून त्या काळच्या तरुणीच्या वेषभूषा आणि अलंकाराची माहिती मिळते. (पुनरूक्ती दोष टाळण्यासाठी ती माहिती अलंकाराच्या वर्णनात दिली आहे.) तरी मालतीच्या वेषात पायघोळ कंचुक आणि त्याच्या खाली घोळणारा चंड्तक (परकर)दाखविला आहे.[६९]

**पडदा प्रथा –** लज्जानिवारण्यासाठी अवगुंठनाचा उल्लेख रामायणात मिळतो. जसे नीलं सतोयमेघाभं वस्त्रं समवगुण्ठितम्।[७०]

कालिदासाच्या काळात पडदा प्रथेचा क्वचित उल्लेख येतो. आश्रमातील शकुन्तला दुष्यन्ताच्या गजबजलेल्या दरबारात येते तेव्हा 'अवगुण्ठितवती' दाखविलेली आहे.[७१]

कदाचित बाणभट्टाच्या काळी घुंघट घेण्याची प्रथा वाढीस लागली असावी. ग्रामीण स्त्रियांच्या वर्णनात बाणाने घुंघट घेण्याचा उल्लेख केला आहे. पौरस्त्रियांच्या वर्णनात त्याने नीलांशुक जाळीचा उल्लेख केला आहे. तिचा मुखावरण म्हणून उपयोग होत असे. 'सुगंधित श्वासांनी आकर्षित झालेल भुंगे त्यांच्या मुखावर घुंघटाचे काम करीत तरीसुद्धा रीत म्हणून कुलीन स्त्रिया चेहऱ्यावर जाळीचा घुंघट घेत असत.' असे बाणाने स्थाण्वीश्वर स्त्रियांचे वर्णन करताना लिहिले आहे.[७२] पुढे हा रिवाज पडला असावा. माघाने देखील राजकुलाच्या स्त्रियांच्या वर्णनात स्पष्ट शब्दात घुंघटाचा उल्लेख केला आहे. सेवकांच्या लवाजम्यासोबत जाणाऱ्या, घुंघट घेणाऱ्या, क्षणमात्र दृष्टीस पडणाऱ्या, शोभिवंत चेहऱ्याच्या राण्यांना लोक कौतुकमिश्रित भयाने पाहात होते.

या नाञ्जन परिजनैरवतार्यमाणा राज्ञीर्नरायनयनाकुलसौविदल्ला:,
स्रस्तावगुण्ठनपटा:क्षणलक्ष्यमाणवक्त्रश्रिय: सभयकौतुकमीक्षते स्म।।[७३]

वरील उदाहरणावरून बाणभट्टापर्यंत पडदा प्रथेचे पदार्पण समाजात झाले होते. परंतु मुसलमानांच्या प्रभावाने तिचा अतिरेक झाला.

**शोक प्रसंगाचा वेष –**

भासाच्या दूतघटोत्कच या उत्सृष्टिकांकात अभिमन्यूच्या मृत्यूची बातमी ऐकून दु:शला म्हणते ''अद्यकालीनं ते वेषग्रहणम् अहमपि उपधारयिष्यामि।''[७४] उत्तरा अभिमन्यूच्या मृत्यूनंतर जो वेष धारण करील तो मी देखील लवकरच धारण करीन असा तिच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. ह्यावरून सती जातांना विशिष्ट वेष धारण करीत. हर्षचरितात त्याला 'मरण प्रसाधनम्' म्हटले आहे. प्रभाकर वर्धनाच्या मरणासन्न स्थितीत आपल्या

शोकाकुल राणी यशोवतीने त्याच्या मृत्यूपूर्वीच विचित्र मनस्थितीत सतीवेष धारण केला होता. तिने कुसुम्भी रंगाचे वस्त्र आणि गळ्यात लाल कण्ठसूत्रधारण केले होते. वस्त्राच्या पदरात चिताग्नीच्या पूजेसाठी फुले भरली होती. [७५]

चंद्रपीडाच्या मृत्यूनंतर कादंबरीने आभूषण आणि शृंगार वेष उतरवून शुभ्र दुकुल धारण केले होते आणि वारंवार ओठावरील तांबुल रंग काढण्याचा/ पुसण्याचा प्रयत्न केला होता.[७६]

बाणभट्टाने पुष्कळशा जातीच्या आणि धर्माच्या लोकांच्या वेषभूषेचा उल्लेख आपल्या साहित्य कृतीत केला आहे. वैशंपायन पोपटाला घेऊन येणारी चांडाल कन्या किरातवेषात होती. तिच्या शरीरावर घोट्यापर्यंत लोबंणारा निळा अंगरखा (कंचुक) होता आणि वर लाल दुपट्टा होता.[७७]

**सोमेश्वर** –(इ.स.बारावे शतक)

११२७ साली सिंहासनारूढ झालेल्या राजा सोमेश्वराने आपल्या 'मानसोल्लास' या ग्रंथात 'वस्त्रोपभोग' या शीर्षकाखाली राजवस्त्रांचे प्रकार, रंग, ऋतुकालानुरूप वापरायची वस्त्रे याबद्दल सविस्तर लिहिले आहे. त्या सर्व विवेचनावरून वस्त्र निर्माणातील कार्यातील प्रगती लक्षात येते.

**रंगीत वस्त्रे** – मानसोल्लासात अनेक प्रकारच्या वस्त्रांचे वर्णन केले आहे. त्यात पांढऱ्या रेखा, विविध वर्णाच्या रेखा, पाच रंगाच्या रेखा, चौकानी रेखा, बिंदूयुक्त, मजबूत, तलम, जाड, विरळ, हलक्या वजनाचे, बहुमूल्य, यंत्राद्वारे रंगविलेले, लाक्षारसाने, मंजिष्ठाच्या लाल रंगाने रंगलेले, कुसुंभ, सिंदूर, अभयरस इत्यादीनी रंगविलेले निळे, पोपटाच्या पिसासारखे, कोकिळाच्या कंठासारखे छटा असलेले अशा अनेक आकार आणि प्रकाराचे रंगीबेरंगी वस्त्राचे वर्णन आले आहेत.[७८]

यानंतर ऋतुनुसार कसे वस्त्र परिधान करावे ते सोमेश्वराने सांगितले आहेत.वसंत ऋतूत रेशीम किंवा कापडाचे तलम वस्त्र धारण करावे तर ग्रीष्म ऋतूत वेगवेगळ्या धाग्यांपासून बनविलेले तलम पांढरी वस्त्रे धारण

करावी. पावसाळ्यात मंजिष्ठाने लाल केलेले तसेच गुलाबी आणि करड्या रंगाची वस्त्रे धारण करावी.[७९] शरदकाळी भव्य (पायघोळ), जाड तसेच तलम वस्त्र धारण करावे आणि थंडीत अंगिका अणि पटीता धारण करावे.[८०]

प्रसंगानुसार, ऋतुनुसार थंड वारे सुटले असता प्रयाणाच्या वेळी जलक्रीडेच्या वेळी विविध देशातून आणलेल्या अत्यंत बहुमूल्य, श्रेष्ठ आणि रंगीबेरंगी वस्त्रांना शृंगारपूर्वक धारण करणे म्हणजे वस्त्रोपभोग आहे.[८१] याशिवाय क्षौम, कार्पास, रोमज आणि अंशुक असे वस्त्राचे चार प्रकार सोमेश्वराने सांगितले आहे.[८२] याशिवाय भांग, सन, अथवा पटसनाच्या तंतूपासून बनलेले वस्त्र अधिक मुलायम असे. सोमेश्वराने बंगाल देशात तयार होणाऱ्या वस्त्राचांही असा उल्लेख केला आहे. वंगदेशभवानि च। तसेच 'महाचीनभवानि च'[८३] असा चीन देशातील अंशुकाचा उल्लेख केला आहे. यावरून असे दिसते की भारतात भारतीय रेशीम आणि चीनचे रेशीम असे रेशमाचे दोन प्रकार कालिदासाच्या काळापासून प्रसिद्ध होते. कारण कालिदासाच्या शांकुतलमध्ये 'चीनांशुक' असा रथावरील ध्वजाच्या वस्त्राचा उल्लेख आला आहे.[८४] वेंदात ग्रंथ पंचदशीवरून लक्षात येते की त्याकाळी कपड्यावर काढण्यात येणाऱ्या चित्रांचे धौत,मंडित, लांछित आणि रंजित असे चार प्रकार होते.[८५]

याशिवाय वस्त्र परिधानासाठी योग्य मुहूर्त, शुभ नक्षत्र, वार इत्यादीविषयी सोमेश्वराने सविस्तर कथन केले आहेत.[८६] वस्त्रांना सुगंधित करण्यासाठी पटवास देखील असत. वराहमिहिराने पटवास कसे तयार करायचे ते गंधयुक्ती प्रकरणात सांगितले आहेत.[८७]

या प्रकरणात वेदापासून म्हणजे सुमारे पाच हजार वर्षापासून ते इ.स. १२व्या शतकापर्यंत अशा सुमारे पाच ते सहा हजार वर्षातील वस्त्र प्रसाधनाचा आढावा घेण्यात आला आहे. त्यात वेद वाड्मय, आर्ष वाड्मय, निवडक सूत्रवाड्मय, प्रातिनिधिक अभिजात साहित्य आणि

निवडक शास्त्रग्रंथ अशा संस्कृत साहित्याचा धांडोळा घेतला असता वस्त्रप्रसाधनाविषयी पुढील ठळक वैशिष्टये नजरेत भरतात.

(१) वेदात वस्त्रांचे तानेबाणे यामध्ये देवता वास करतात अशी श्रद्धा होती.त्यामुळे वस्त्राला दैवी अधिष्ठान देऊन शरीराच्या रक्षणांचे दायित्व त्या देवांना बहाल करण्यात येत असे असा लोकविश्वास प्रतीत होतो.

(२) वेदकाळी वस्त्र हे सौंदर्यात भर टाकते अशी कल्पना रूजली होती म्हणून तेही प्रसाधनात अंतर्भूत होते ह्या उत्तरकालीन धारणेची पुष्टी वेदातच होते.

(३) वेदकाळापासून भरजरी वस्त्रांचे प्रचलन होते. त्या भरजरी वस्त्रात सोने, हिंरे जडवलेले असत. त्याकाळी पांढऱ्या (उज्ज्वल) वस्त्राला मान होता.

(५) सुंदर वेष घातलेल्या व्यक्तीला समाजात प्रतिष्ठित मानले जात.

(६) वस्त्र धारण करण्याचा हेतू शालीनता, मंगलता आणि प्रतिष्ठा हा होता.

(७) त्याकाळी स्त्रियांसाठी रंगीत वस्त्रांचे प्रचलन होते. अर्थात वस्त्र रंगविण्याचे तंत्र वेदकालीन समाजाला अवगत होते.

(८) वेदकाली वस्त्र विणण्याचे काम घरोघरी स्त्रिया करीत. विशेषत: पतीचे वस्त्र तिच विणत असे. या मागे प्रेमाच्या धाग्याने पतीला बांधून ठेवण्याची भावना होती. ही गोष्ट वैदिक आर्यांच्या कौटुंबिक प्रेमाला अधोरेखित करते.

(९) घरोघरी वस्त्र निर्मितीच्या उपक्रमाला कुटीरोद्योगाचे स्वरूप आले असावे असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरणार नाही.

(१०) आजच्यासारखी विवाहादी उत्सव प्रसंगी अहेर (वस्त्रदान) देण्याची पद्धत होती.

(११) वस्त्रांना सुगंधित करण्यासाठी पटवास देखील असे.



(१२) वस्त्रपरिधानाचे निबंधनीय, प्रक्षेप्य, आरोप्य असे तीन प्रकार होते.

(१३) अंशुक, कार्पास, क्षौम, कौशेय, दुकुल, चर्मवस्त्र, रांकव, रोमज, कंबल असे वस्त्राचे प्रकार वेदकाळापासून अस्तित्वात होते.

(१४) त्याकाळी चीनदेशाहून रेशमी वस्त्राची (चीनांशुक) आयात होत होती. म्हणजे त्याकाळापासून चीन देशाशी भारताचे आंतरराष्ट्रीय व्यापार संबंध होते.

(१५) विद्यार्थी, संन्यासी, विवाहित स्त्री, पुरूष, श्रीमंत लोक यांचे वेष वेगवेगळे होते. तसेच ऋतुकाल, प्रसंग, प्रदेश आणि आश्रमानुकूल विविध वेष धारण करण्याची पद्धत होती.

मानवाच्या प्रकृतीकडून संस्कृतीकडे जाणाऱ्या प्रवासाचे वस्त्र हे प्रतीक आहे. कालदृष्ट्या चार प्रकारच्या प्रसाधनात वस्त्रांचा क्रमांक वरचा आहे. संपूर्ण संस्कृत साहित्याचे विहंगावलोकन केले असता वस्त्रप्रसाधनाचा हा उज्ज्वल इतिहास भारतीय संस्कृतीची उन्नतवस्था, येथील विविधता, भारताची प्राचीन परंपरा आणि वैभव यांना अधोरेखित करतो.

-----

## संदर्भ सूची


१ उत्तरमेघ २

२ पुष्पमाला, पृ.६१

३ ऋग्वेदिक आर्य, पृ.१५४

४ तत्रैव १३-८/२६, पृ.१५६

५ तत्रैव १३-१२५ पृ. १५६

६ तत्रैव ३-६/२९ पृ.१५६

७ तत्रैव पृ.१५६



८ ७-१/११३ ऋग्वेदित आर्य, पृ.१५५

९ तत्रैव २/३/२९, पृ.१५५
१० अथर्व २८
११ अथर्व ६/८२/५३
१२ अथर्व १४/२/४१
१३ तत्रैव
१४ तत्रैव १/३७/७२६
१५ तत्रैव ५१/३७/६
१६ तत्रैव १४/१/४५
१७ तत्रैव ४१/६०/६
१८. तत्रैव ५१/६०/६
१९ तत्रैव १४/१/२८
२०. तत्रैव
२१ तत्रैव
२२ तत्रैव १४/२/४४
२३ तत्रैव ३/१/२०१८
२४. वा.रामायण २/१२/९९
२४अ. Study Deccan Chronicle,
https://www.google.com/cea, last
२५ वा.रामायण ५/१०/७
२६ वा.रामायण ५/१५/४५ seen on 2.1.2019
२७ वा.रामायण ३/१/१३ रुपं संहननं लक्ष्मी सौकुमार्यं सुवेषताम्। ददृशुर्विस्मिताकारा रामस्य वनवासिनः।।
२८ वा. रामायण २/४/३०

२९ वा. रामायण १/७७/१२
३० आ. श्रौ. सुत्र. २/३/४/१७

३१ वा. रामायण ६/४३/...
३२ वा. रामायण २/५/२६
३३ वा. रामायण५/९/३३
३४ वा. रामायण ३/३८/१४
३५ वा. रामायण २/३२/३१-३४
३६ वा. रामायण ३/११/५७
३७ वा. रामायण ५/१९/३
३८ वा. रामायण ५/१५/४७
३९ वा. रामायण५/५३/६
४० वा. रामायण ५/१०/७
४१ महाभारत सभा ७/५
४२ तत्रैव ५१/२७
४३ तत्रैव ७/१५-१६
४४ तत्रैव ४७/३
४५ तत्रैव ४७/४
४६ तत्रैव ४७/११
४७ तत्रैव ५२/३३-३४
४८ तत्रैव ६५/८-९
४९ अश्वघोष की कृतियोमें चित्रित भारतीय संस्कृती पृ.७४
५० तत्रैव
५१ बु.च. ६/८
५२ सौंदरानन्द ५/७
५३ तत्रैव६/२६

५४ तत्रैव १२/१०७

५५ बु.च. ६/८
५६ तत्रैव पृ...
५७ तत्रैव पृ...
५८ अर्थशास्त्र अधि २/११ प्र.२९ पृ.१२९
५९ तत्रैव पृ. १२९
६० तत्रैव अधि २/२९ पृ.१३०
६१ तत्रैव अधि २/२९ पृ.१३०
६२ तत्रैव अधि २/२९ पृ.१३०
६३ तत्रैव अधि २/२९ पृ.१३०
६४ तत्रैव अधि २/२९ पृ. १३१ए११२-११८
६५ तत्रैव अधि २/२९
६७ कामसूत्र पृ...
६८ कामसूत्र पृ...
६९ नाट्यशास्त्र अ. २३/६७-७०
७० कुमार ७/२२
७१ ऋतु १/४-६
७२ ऋतु २/२१
७३ ऋतु ५/५
७४ ऋतु ५/८
७५ ऋतु ५/८
७६ ऋतु ६/ ५ ते ८
७७ कांदबरी पृ. ८३
७८ तत्रैव पृ...

७९ रामायण ७/२६/१८

८० शाकु - अं.५
८१ हर्ष - ३ पृ. १६२-६३
८२ शिशु - ५/१७
८३ दूत पटीत्कच - पृ. १२
८४ हर्ष - १ पृ. ५१-५२
८५ कांदबरी पृ. ३९०
८६ कांदबरी पृ. पृ. ५६
८७ मानस ३/६/१०२१-३३
८८ तत्रैव १०३४-३५
८९ तत्रैव १०३६-३८
९० तत्रैव १०३९-४०
९१ तत्रैव
९२ तत्रैव १०२०
९३ शांकु ३/१८
९४ मानस ३/६/१००९-१३
९५ पंचदशी ६/१-३
९६ बृहतसंहिता गंधयुक्ती अ. ८८

-----

## प्रकरण तिसरे

# संस्कृत साहित्यातील केशप्रसाधन

केशा नडा इव वर्धन्तां शीर्ष्णस्ते असिताः परि।

तुझ्या मस्तकावर काळे केस गवताप्रमाणे वाढोत.

अथर्ववेद

# प्रकरण तिसरे
# संस्कृत साहित्यातील केशप्रसाधन

शिर हे मनुष्याच्या शरीराचे उत्तमांग म्हटले जाते. ह्या उत्तमांगाच्या रक्षणासाठी विधात्याने स्त्री-पुरुषांना केसाचा मुकुट बहाल केला. ह्या सुंदर, काळ्या, दाट केसांच्या महिरपीने चेहऱ्याला शोभा आणण्याचे काम केले. त्यामुळे मनुष्याच्या एकूण सौंदर्यात केसाला महत्त्वाचे स्थान मिळाले. ह्या केसाला संस्कृतमध्ये कुंतल, अलक, कच,केश,मूर्धज, शिरोरूह इत्यादी अनेक नावे आहेत. मानवी सौंदर्य वाढविण्यात केसांचे 'मूर्धन्य' स्थान ओळखून भारतीयांनी प्राचीन काळापासून वेषभूषेप्रमाणे केशभूषेलाही महत्त्व दिले आहे. मल्लिनाथाने केशप्रसाधनाला 'कचधार्य' असे नाव दिले आहे.

प्राचीन काळी अलंकारात केशप्रसाधनाला महत्त्वाचे स्थान होते. अनेक प्रकाराने केसाला सजविणे, काळे करणे, कलप लावणे, वाढविणे केशरचना करणे आणि त्याला पुष्पादी आणि सुवर्णादी
आभरणांनी अलंकृत करणे ह्या सर्व प्रकारांचा केशप्रसाधनात समावेश होत होता. एवढेच नव्हे तर स्त्री शृंगाराच्या सर्वमान्य सोळा गोष्टीत केशरचना आणि केशसज्जा या दोन्ही गोष्टीचा समावेश आहे.[२] स्त्रियांनी आपल्या केसांची रचना करून त्यावर फुले माळणे हे प्राचीन काळी दैनंदिन जीवनशैलीचा भाग होता. याचे पुरावे संस्कृत साहित्यात तसेच शास्त्रीय ग्रंथात मिळतात.आजही एकूण सौंदर्य प्रसाधनांचा विचार केला असता त्यातील अर्धीअधिक प्रसाधने केसाशी संबंधित असतात. उदा. कलप, शाम्पू, जेल आणि सुगंधित तेल इत्यादी. या प्रकरणात आपण प्राचीन केश प्रसाधनांचा विचार करणार आहोत. प्राचीन केशप्रसाधन चार भागात विभागले असून पुढील आलेखावरून त्याची व्याप्ती लक्षात येईल. (पृ.३७)


केशप्रसाधन
केशरक्षण
केशरंजन
केशरचना
केशभूषा
केशरक्षण
केशभूषा
आरोग्यरक्षण
समस्यानिवारण
नैसर्गिक अलंकार
सुवर्णादी अलंकार

धूपयंत्र



केशप्रसाधनाचे उल्लेख वेद, रामायण, महाभारत, अश्वघोष तसेच कालिदासादी कवीच्या वाङ्मयात आढळतात. तसेच नाट्यशास्त्र, कामसूत्र, बृहत्संहिता, मानसोल्लास आणि वैद्यकशास्त्रात आढळतात. याशिवाय विविध काळातील शिल्पांवरून याचे प्रत्यक्ष पुरावे देखील मिळतात.

आपल्या पूर्वजांनी केसांचा विचार गंभीरपणे केलेला दिसतो. चरकाचार्यांनी स्पष्टच म्हटले आहे ''प्रसिद्धःकेसःस्यात्''[३] माणसाने केस सुसज्जित ठेवावे. अर्थात नीट केशभूषा करावी. पूर्वीच्या काळी स्त्री पुरुष दोघेही केस वाढवीत. वाढविलेल्या केसांना स्वच्छ ठेवणे आणि व्यवस्थित राखणे आवश्यक आहे कारण केशरचना हा आपल्या व्यक्तिमत्त्वाचा एक महत्वाचा भाग आहे. प्राचीन काळीही केशरक्षणाचा विचार आपल्या पूर्वजांनी केला होता. चरक संहितेत स्पष्ट सूचना दिली आहे की दर पाचव्या दिवशी दाढी-मिशा आणि नखे कापावीत.[४] प्राचीन काळी काही लोक केस राखत याचा पुरावा शिल्पकलेवरून मिळतो. भरहुत आणि साँचींच्या स्तूपावरील मूर्तींना दाढी-मिशा नाहीत. राजा प्रसेनजित, अजातशत्रू आणि भगवान बुद्धांच्या काळात दाढी-मिशा कापण्याची पद्धत असावी असे तेथील शिल्पावरून लक्षात येते.

**केशरक्षण** -केसरक्षणामध्ये साधारणतः दोन गोष्टीचा समावेश होतो - (१) केसांचे आरोग्य (२) केसविषयक समस्यांचे निवारण

**केसांचे आरोग्य** - केसांचे आरोग्य चांगले राहिले तर केस सुंदर, लांब, दाट आणि मजबूत होतील. म्हणून अथर्व वेदामध्ये वीतहव्य ऋषींनी केशवर्धक औषधी वनस्पतीला उद्देशून काही सूक्ते रचली आहेत. ऋषी म्हणतात,

'' हे दिव्य औषधी, तू पृथ्वीदेवीमध्ये उत्पन्न झाली आहेत. हे नितत्नि, खाली पसरत जाणाऱ्या औषधी, केसांना सुदृढ करण्यासाठी मी तुला खणून काढतो. जुन्या केसांना सुदृढ कर. जेथे केस उत्पन्न झाले नाहीत तेथे उत्पन्न कर आणि जे उत्पन्न झाले आहे त्यांना चांगले लांब

सडक कर. जे तुझे केस गळून पडतात आणि मुळासह तुटून पडतात त्या केसांना, केसांचे दोष दूर करणाऱ्या औषधी वेलीच्या रसाने भिजवितो.''[५] पुढे ऋषी म्हणतात –

''ज्या केसांची लांबी बोटाने मापली जात होती ते हाताच्या लांबीने मापण्या योग्य झाले आहेत.तुझ्या मस्तकावर काळे केस 'विशिष्ट'गवताप्रमाणे वाढोत.'' हे औषधे, केसांची मुळे मजबूत कर. अग्रभाग सारखे कर आणि मधल्या भागांचे नियमन कर. तुझ्या मस्तकावर काळे केस गवताप्रमाणे वाढो.''[६]

शन्ताति ऋषि सुदृढ आणि लांब केसासाठी रेवती नामक वनस्पतीला प्रार्थना करतात– ''हे सामर्थ्ययुक्त हिंसाविरहित आणि आरोग्य देणाऱ्या रेवती औषधे, आरोग्य देण्याची इच्छा कर आणि केसांना सुदृढ करणारी हो आणि केस वाढविणारी हो.''[७]

वरील मंत्रावरून असे लक्षात येते की लांब, दाट, मजबूत आणि काळे केस वेदकाळी देखील आकर्षणाचा विषय होते. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे केशरक्षण संवर्धन आणि केसांचे आरोग्य याबाबत वैदिक आर्य जागरूक होते असे दिसते. त्यासाठी नितत्नि आणि रेवती सारख्या वनस्पतींच्या रसांचा ते नियमित वापर करत असावे असे दिसते. आज त्या वनस्पती नेमक्या कोणत्या याचा शोध घेणे आवश्यक आहे.

तसेच केशरक्षणासाठी, केसातील मळ काढणे, त्यांना विंचरणे हे त्यांना ठाऊक होते त्यासाठी ते अनेक दात असलेला कंगवा/फणी सुद्धा वापरत. अशा फणींचा उल्लेख अथर्व वेदात आला आहे –

हा शेकडो दात असलेला कृत्रिम कंगवा आहे तो तिच्या डोक्यातील मळ दूर करो 'असा आशय ह्या मंत्रावरून लक्षात येतो.'[८]

**केशरक्षण** – केस मजबूत व्हावे, केसांची वाढ व्हावी आणि ते काळे रहावे म्हणून प्राचीन काळापासून आजतागायत केसांना तेल लावण्याची पद्धत आहे. झाडांच्या मुळांना जसे पाणी आवश्यक असते तसे केसांच्या मुळांना तेल आवश्यक असते. स्नेह म्हणजे तेल तसेच स्नेह म्हणजे प्रेम हे

दोन्ही अर्थ घेऊन पंचतंत्रकार श्लेषाने म्हणतात डोक्यावर धारण केलेले,''तेल लावून वाढवलेले केसही तेलाविना शुष्क होतात. तसेच (एकेकाळी)डोक्यावर घेतलेले, प्रेमाने
सांभाळलेले नोकरही प्रेमाविना दुरावले तर काय नवल?[९] आचार्य चरकांनीही तेलाचे महत्त्व पुढील प्रमाणे सांगितले आहेत.

नित्यं स्नेहार्दशिरसि शिर:शूलं न जायते
न खालित्यं न पालित्यं न केशा: प्रपतन्तिच ।।
बलं शिर: कपालानां विशेषेण विवर्धते
दृढमूलाश्च दीर्घाश्च कृष्णा: केशा भवन्ति च ।।
इन्द्रियाणि प्रसीदन्ति सुत्वग्भवति चाननम्
निद्रालाभ: सुखं च स्यात् मूर्घ्नि तैलनिषेवणात् ।।[१०]

भारत उष्ण कटीबंधात येत असल्यामुळे येथे घामाचे प्रमाणही खूप आहे. त्यामुळे घामाच्या दुर्गन्धीला दूर करण्यासाठी केसांना
लावायचे तेल सुगंधित असे. वराहमिहिराने आपल्या बृहत्संहिता या ग्रंथात सुगंधी तेल बनविण्याचा विधी पुढीलप्रमाणे सांगितला आहे.[११]

**चम्पक तेल** –

मंजिष्ठा, व्याघ्रनख, शंख, जटामासी (कुष्ठ) इत्यादी सर्व वस्तूंचे प्रमाण समभाग घेऊन ते तेलात मिसळून सूर्य प्रकाशात तापविले असता सुगंधित चम्पक तेल तयार होते.

**अत्तर** –

सर्वच प्रसाधन निर्मितीतन्त्रामध्ये एक अतिशय महत्त्वाचा आणि पायाभूत घटक म्हणजे सुगंध आणि त्यासाठी अत्तर (अर्क) हे फार महत्त्वाची कामगिरी पार पाडते. मग चेहऱ्याला लावायचे पावडर (चुर्णक) असो, क्रिम (लेप) असो, तेल असो किंवा डिओड्रन्ट (कक्षवास) असो. सर्व प्रसाधनात अत्तर हा घटक समान असतो हे जाणून वराहमिहिराने आपल्या ग्रंथातील संपूर्ण अध्याय सुगन्धी द्रव्याला वाहिला आहे. त्या

प्रकरणाचे नाव 'गन्धयुक्ती'. गंध म्हणजे सुगंध आणि युक्ति म्हणजे संगती (Combination)

गन्धयुक्ती नामक ७७व्या प्रकरणाच्या आरम्भी वराहमिहिराने सुमारे ३५ श्लोकात अत्तर निर्मितीच्या कक्षेत येणाऱ्या सम्बन्धित शब्दांचा कोश प्रस्तुत केला आहे. त्यावरून अभ्यासकाला किंवा उत्पादकाला निसर्गातील सर्व सुगंधी वनस्पतीच्या नावाचा परिचय घडतो. त्यानंतर त्या वराहमिहिराने केसांना सुगंधित करण्यासाठी वापरण्यात येणाऱ्या सुगंधी धूप, तेल इत्यादी तयार करण्याची रीत (Formula) सांगितली आहे. ती पुढीलप्रमाणे आहेत.

घनवालकशैलेयककर्पूरोशीरनागपुष्पाणि
व्याघ्रनखस्पृक्कागुरुमदनकनखतगरधान्यानि।
कर्चूरचोलमलयैः स्वेच्छा परिवर्तितैश्चतुर्भिरतः
एकद्वित्रिचतुर्भिर्भागैर्गन्धार्णवो भवति।।[१२]

वाळा, कापूर, नागकेशर, जटामासी, चंदन इत्यादी १६ प्रकारचे द्रव्य वेगवेगळ्या संगतीने एकत्र करून ९६ प्रकारचे अत्तर किंवा सुगंधी द्रव्य तयार करता येतात आणि ह्या ६ सुगंधाच्या मिश्रणाने १७,०४,७२० सुगंध तयार करता येतात. त्याप्रमाणे स्नानासाठी अत्तर बनवायचे असल्यास राळ, दालचिनी आणि जाई ह्यांच्या अर्कापासून ते बनवावेत. वरील सर्व वर्णनावरून असे लक्षात येते की प्राचीन काळी संपन्न लोकांच्या जीवनात अत्तराला फार महत्त्व होते आणि अत्तर निर्मितीचा व्यवसायही मोठ्या प्रमाणात अस्तित्वात असावा याला पुष्टी मिळते.

**केसविषयक समस्यांचे निवारण–**

केसरक्षणांमध्ये केसांच्या आरोग्य विषयक समस्या दूर करणे यांचाही समावेश आहे. केसांच्या आरोग्याच्या आज ज्या काही समस्या आहेत तशा पूर्वीही होत्या जसे केसात कोंडा होणे (दारूण रोग), केसांच्या आतील त्वचेवर फोड येणे (अरूंषिका), अकाली केस गळणे किंवा टक्कल पडणे(पलितम्) या समस्यावर आयुर्वेदात उपाय सांगितले आहेत. हे उपाय

दोन प्रकारे केले जातात. (१) विविध औषधीचा लेप (२) औषधियुक्त तेलांचा वापर

त्यात खवडा (अरूंषिका) दूर करण्यासाठी अरूंषिकाहरलेप आणि कोंडा दूर करण्यासाठी दारूणरोगहरलेप असे अनेक लेप सांगितले आहेत. स्थालीपुलाकन्यायाने दारुणरोगहरलेप देत आहेत.

दुग्धेन खाखसं बीजं प्रलेपाद् दारूणं जयेत्।
आन्त्रबीजस्य चूर्णं तु शिवाचूर्णसमं द्वय ।
दुग्धपिष्टः प्रलेपोऽयं दारूणं हन्ति दारूणम् ।।[१३]

खसखस दुधात वाटून त्याचा लेप लावला असता दारूणक रोग दूर होतो. याशिवाय आंबाच्या कोयीचे चूर्ण तसेच हरड्याचे चूर्ण दोन्ही समभाग घेऊन दूधात वाटून लेप करावा. हा लेप केसांना लावल्याने दारूणक रोग दूर होतो.

**इन्द्रलुप्तरोग –**

पुरुषांच्या दाढी–मिशांचे केस गळणे या समस्येला इंद्रलुप्त असे नाव आहेत. यासाठी आयुर्वेदात इंद्रलुप्तहर लेप सुचविले आहे. तर केस गळणे, टक्कल पडणे यावर केशवर्धक लेप, रोमोत्पादक लेप रामसंजनन लेप, पलितनाशक लेप असे अनेक लेप शारंगधराने सांगितले आहे. त्यातील एका लेपाची प्रशंसा करताना त्याने, 'या लेपाने तळहातावर देखील केस येतील' असे छातीठोकपणे सांगितले आहे. तो लेप पुढीलप्रमाणे आहेत.

हस्तीदन्तमषी कृत्वा छागीदुग्धं रसाञ्जनम्।
रोमाण्यनेन जायन्ते लेपात् पाणितलेष्वपि।।[१४]

हस्तिदंताचे भस्म, रसाञ्जन या दोन्ही द्रव्यांना शेळीच्या दूधात वाटून केलेला लेप तळहातावरही केस उगवितो.

**पलित रोग –**

गोखरू, तिळाचे फूल, मध आणि तूप यांचा लेप लावल्याने डोक्यांवरील केसांची भरपूर वाढ होते. केस गळण्याची आणि केस पांढरे

होण्याची समस्या दूर करण्यासाठी इंद्रवारुणीच्या बियांच्या तेलाने डोक्याला मालीश करावी. त्याने केस भ्रमरासारखे काळे होतात.[१५]

लोहचूर्ण, भृगंराज, त्रिफळा आणि काळी माती या सर्वांना एक महिन्यापर्यंत ऊसाच्या रसात ठेवावे. त्यानंतर तयार झालेला लेप पलित नष्ट करतो.[१६] असे पाच प्रकारचे पलितनाशक लेप शारंगधराने सांगितले आहेत

**रोमनाशक लेप –**

केस उगविण्यासाठी जसे आयुर्वेदात लेप सांगितले आहेत तसे नको असलेल्या केसांसाठीही रोमनाशक लेप सांगितले आहेत.[१७] असाच एक लेप पुढे देत आहे.

हरितालं पलाशस्य भस्म रम्भाजलान्वितम्
एतस्य लेपाल्लोमानि न रोहन्ति कदाचन ।[१८]

चेहऱ्यावर येणारे मांसांकूर (मस) देखील कधीकधी सौंदर्यात उणेपणा आणतात. अशा मासांकुरांना नष्ट करण्यासाठी शारंगधराने अर्शोलेपही सांगितला आहे.

स्वर्जिकातुत्थशैलेयमञ्जनं सरसाञ्जनम्।
मन:शिलालेपसमं चूर्णं मांसाङ्कुरापहम् ।।[१९]

**केशधूपन –**

केशधूपन हा केसांना शृंगारण्याचा एक प्रकार होता. प्रथम आवळ्याने केस धूऊन सुंगधित जलाने स्नान केले जायचे. मग अगुरुचा धूप देऊन केस सुकविल्या जात.

घाम किंवा दुर्गंधी ह्यापासून केसांचं रक्षण करण्यासाठी केसांना धूप देण्याची पद्धत होती आणि ती आज सीमित होऊन नुकत्याच प्रसूत झालेल्या स्त्रियांच्या बाबतीतच केशधूपन काही प्रमाणात अस्तित्वात आहे.

संस्कृत साहित्यात अनेकदा या धूपाचा उल्लेख येतो. मेघदूतामध्ये उज्जयिनीच्या प्रासादाच्या गवाक्षातून केशसंस्काराचा धूप बाहेर पडत आहे असा उल्लेख आहे.[२०]

तसेच ऋतुसंहारात ''अगरूसुरभिधूपमोदितं केशपाशं''[२१]- यासारख्या उल्लेखावरून धूप संस्काराचे प्रचलन प्राचीन काळी होत असे लक्षात येते.हा धूप कसा तयार करायचा हे वराहमिहिराने बृहत्संहिता या ग्रंथातील 'गंधयुक्ती' ह्या प्रकरणात स्पष्ट केले आहे.

**केश धूप निर्माण विधी -**

कोपच्छद नावाचा राजधूप तयार करतांना चार भाग खडीसाखर, दोन भाग नागरमोथा, राळ, शंख, गुग्गुळ आणि कापूर ह्या सर्वांचे मिश्रण मधात कालवून त्याचा गोळा बनवायचा की राजधूप तयार झाला.[२२]

ह्याला राजधूप म्हणण्याचे कारण राजे महाराजे आणि श्रीमंत लोकच ह्याचा उपयोग करीत असावे.

धूपाचे सोमेश्वराने तीन प्रकार सांगितले आहे.[२३]

(१) चूर्णधूप (२) पिंडधूप (३) वर्तिधूप

द्विगुणं लघुकर्पूरं चूर्णधूपोऽयमुत्तमः ।।[२४] असे म्हणून त्याने चूर्णधूपाची प्रशंसा केली आहे. अग्निपुराणात तसेच मानसोल्लासात धुपामध्ये कोणती द्रव्ये घालावी ते सांगितले आहे.

पुष्पाणिच सुगन्धीनि धुपश्च घृतसंयुतम्
गुग्गुलं कुंकुमं चैव देवदारुतुरूष्ककम्
सिल्हकं चन्दनं काष्ठं श्रीवासं चागूरुं तथा
सर्ज्जरसं नखं चैव दैवे पैत्रे च कर्मणि ।।[२५]

त्यातही केसांसाठी अगुरु विशेष महत्त्वाचे होते.

कालागुरु कटुकोष्णं केशानां वर्धनं च वर्ण्यं च ।
अपनयति केशदोषानातनुते सततं च सौगन्ध्यम् ।।[२६]

केसांचे दोष दूर करण्यासाठी अगुरु हे उत्तम आहे. अगुरु आणि कालीयक हे कटु आणि उष्ण गुणांचे आहे. ते केसाचा वर्ण काळा करते आणि केसांची वाढ करते. केसाच्या समस्या दूर करते आणि केसात सुंगध निर्माण करते

धूपसंस्कार करण्याचा उद्देश केस सूकविणे, सुंगधित करणे हा होताच त्याचबरोबर केस काळे करणे हा ही होता. केसांना धूतल्यानंतर ते ओले असतांनाच धूप दिल्या जाई. कारण कोरड्या केसांना धूप दिल्याने ते तुटण्याची भिती असे.

कुण्ठत्वमायान्ति गुणा: कवींना साहित्यविद्याश्रमवर्जितेषु।
कुर्यादनाद्रेषु किमङ्गनानां केशेषु कृष्णागुरूधूपवास:।।[२७]

धूप देण्यासाठी धूमयंत्राचाही (पृ. क्र.२६) त्या काळी उपयोग केल्या जाई.

**केशरंजन –**

आज जसे काळे केस हे सौंदर्याचे प्रतीक आहे. तसेच ते पूर्वीही होते म्हणून नायिकेच्या सौंदर्याचे वर्णन करतांना संस्कृत साहित्यिक तिच्या काळ्या केसांचा उल्लेख हमखास करतात. उदा.

अतिबहुलतिमिरपटलान्धकार: कुसुमरहित: केशपाश:। [२८]
आकुलनील कुटिलकुन्तलनिकर विकटमौलि: ।[२९]

काळे केस सुंदर दिसत असल्याने आजच्या युगात सर्वात महत्त्वाचे व सर्वाधिक प्रचारात असलेले केशप्रसाधन म्हणजे 'हेअर डाय' किंवा 'कलप' प्राचीन ग्रंथात ही त्याचा उल्लेख आढळतो. ह्याला प्रमाण म्हणजे वराहमिहिराचा बृहत्संहिता' हा ग्रंथ. कलपाचे महत्त्व सांगतांना वराहमिहिर म्हणतो –

''पुष्पमाला, अत्तर, गन्ध, उंचीवस्त्र, अलंकार इत्यादी प्रसाधन, केस पिकलेल्या माणसाला शोभून दिसत नाहीत. म्हणून जसे काजळाने डोळे सुशोभित करतात तसे केसांना रंग लावून सुशोभित करावे.[३०] केसांना कलप लावण्याचे महत्व सांगितल्यावर पुढील तीन श्लोकात त्याने कलप करण्याचा विधी, कलप लावायची पद्धत, केस धुतल्यावर त्याला लावायचे सुगंधी तेल आणि सुगंधित धूप याचे क्रमश: विवेचन केले आहे.

**कलप करायचा विधी –**

लोखंडाच्या भांड्यात कोद्रवे (कोद्रव) धान्य लोखंडाच्या भुकटी

सोबत शिजवावे. त्याला मऊ करावे. केस स्वच्छ धूऊन ते वाटण (पेस्ट)

डोक्याला लावावे नंतर ओल्या पानाने डोके सहा तास पर्यंत झाकून ठेवावे. त्यांनतर केस धूवावे व त्यावर आवळ्याचा लेप लावावा. पुन्हा त्यावर पाने
झाकून सहा तास ठेवावे. असे केले असता केस काळे होतात. नंतर आम्ल आणि लोहाचा वास निघून जाण्यासाठी केसांना सुगंधित तेल लावावे व वेगवेगळ्या धूपांनी केसांना सुगंधित करावे.[३१]

नितत्नि आणि रेवती या केस काळे करणाऱ्या दोन वनस्पतींचा उल्लेख अथर्व वेदात या पूर्वीच येऊन गेला आहे.

सोमेश्वराच्या 'शिल्पशास्त्रे आयुर्वेदः' या पुस्तकातही केशरंजन, वार्धक्यहरण यासाठी अनेक आयुर्वेदिक उपाय सांगितले आहे ते पुढील प्रमाणे आहे.

**शाल्मलीकल्पगुटी**

'ॐ ह्रां अमृतवस्यन्दिनी अमृतस्रव स्वाहा'
सप्तकृत्वः प्रयुक्तेन मन्त्रेणानेन शाल्मलीम्
अभिमन्त्र्य कुठारेण हव्याद वारान् बहून् सुधीः।।१७।।
''तस्या निर्यास मादाय प्रभाते भास्करोदये।
धात्र्या भृङ्गशतावर्या गुडूच्याः स्वरसैः पृथक्।।१८।।
सप्तवारान् प्रतिरसं तेन भावनमाचरेत्।
सञ्चूर्ण्योलखले कुर्याद् गुटिका बदरैः समाः।।१९।।

प्रतिवासरमेकैकां धारयेद् गुटिकां मुखे
अहनां द्विसप्तके याते नूतना रदना नखाः।।२०।।
सम्भवन्ति ततः केशा भृङ्गपक्षसमत्विषः
द्व्यष्ट वर्षाकृतिईश्या बलवीर्यसमन्वितः।।२०।।[३२]

''शाल्मलीच्या झाडावरून जो डिंक स्त्रवतो तो दुसऱ्या दिवशी गोळा करून त्यात आवळा, भृंग, शतावरी, गुडूची यांच्या स्वरसात वेगवेगळे सात दिवसापर्यंत प्रतिरस भावना द्यावी. मग त्या सर्वांना उखळात

रगडून चांगले चूर्ण बनवायचे आणि त्या चूर्णाच्या बोराएवढ्या गोळ्या तयार करायच्या दररोज एक एक गोळी तोंडात टाकून चोखावी. अशा चौदा दिवसपर्यंत गोळ्या घेतल्यावर दात आणि नख नवे होतील. तसेच केस भ्रमरासारखे काळे होतील. शरीर सोळा वर्षाचे असल्याप्रमाणे बल आणि वीर्यसंपन्न होईल.''

पुढे सोमेश्वराने शाल्मीकल्प नावाचे औषध सांगितले आहे – ''शाल्मली वृक्षाचे मूळ, साल, पान फुले आणि फळ हे पाच अंग घेऊन याचे बारीक चूर्ण करावे हे चूर्ण मध आणि तूपात मिसळायचे आणि सकाळी उठताच दोन तोळे घ्यावे यासोबत पथ्यकर भोजन करावे. अशाप्रकारे एक महिना हे औषध घेतल्याने केस झडण्याचे आणि पांढरे होण्याचे थांबतात. चेहऱ्यावरील सुरकुत्याही मिटतात.''[३३]

या आणि अशा अनेक उपायांचे वर्णन करून तारुण्य परत मिळविण्याचे (Antiaging) उपाय सोमेश्वराने सांगितले आहे.

**केशरचना –**

केसांना सजविण्यासाठी पूर्वी विविध केशरचना करीत. स्त्री–पुरूष दोघेही केस वाढवित. विरहीणी स्त्रिया एक पेडी वेणी धारण करत किंवा केस मोकळे सोडत 'एकवेणीधरा दीना त्वयि चिन्ता परायणा'[३४] असे रामायणात सीतेचे वर्णन आले आहे. अर्थात इतर स्त्रिया विविध केशरचना करत.

भरतमुनींनी नाट्यशास्त्रात भारतातील विविध प्रांतात रूढ असलेल्या विविध केशरचनेचे वर्णन केले आहे.

आवंत्ययुवतींना तु शिरस्सालक कुन्तलम्।।
गौडीनामलकप्रायं सशिखायाशवेणिकम्।
आभीरयुवतींना तु द्विवेणीधर एव तु।।
शिरः परिगमः कार्यो नील प्राययथाम्बरम्

तथा पूर्वोत्तरस्त्रीणां समुन्नद्धशिखण्डकम्।।

आकेशातच्छादनं तासां देशकर्मणि कीर्तितम्
तथैव दक्षिणस्त्रीणां कार्यमुल्लेख्य संश्रयम्।।[३५]

त्याकाळी प्रचलीत असलेल्या विविध केशरचनांचा पुरावा प्राचीन शिल्पावरूनही मिळतो. तो प्रकरणाच्या शेवटी दिला आहे. त्यावरून केसप्रसाधनकला बरीच पुढे गेली होती असे म्हणण्यास प्रत्यवाय नसावा.

**अंबाडा (जूडा) –**

संस्कृतमध्ये 'जूट' किंवा 'चूडा' शब्द स्त्रियांच्या केशरचनेचा एक प्रकार आहे. त्याला हिंदीत जूडा शब्द प्रचलित आहे. संपूर्ण केस गोलाकार लपेटून त्याचा शिरोभागावर मागे किंवा एकाबाजूला गोलाकार बांधत त्याला चूडापाश म्हणत. ह्या केशरचनेचा उल्लेख मेघदूतात आला आहे.[३६] ह्या चूडापाशाची परंपरा थेट वेदापर्यंत जाऊन पोहोचली. ऋग्वेदकाळी याला कपर्द असे म्हणत असा उल्लेख मिळतो. वेगवेगळ्या कुळांचे लोक डोक्याचा विविध भागावर कपर्द बांधत. वसिष्ठ ऋषींच्या कुळातील लोक उजव्या बाजूला कपर्द बांधत.[३७] (दक्षिणहस्त कपर्दा) ऋग्वेदात यज्ञवेदीला एके ठिकाणी चार चूडा घातलेल्या युवतांची उपमा दिलेली आहे.[३८] (चतुष्कपर्दा)

त्याकाळी स्त्री पुरुष दोघेही जुडा घालत असे दिसते.[३९] रामायण काळी दाक्षिणात्य पुरुष 'पुष्पापीडाने' अंबाडा सजवित असत. आपीड हा अंबाड्याचा पुष्पांलकार होता. (हल्लीच्या गजऱ्यासारखा) कामसूत्रात ६४ कलांमध्ये 'आपीडयोजना' ही कला समाविष्ट आहे. ज्याची व्याख्या करतांना जय मंगलकार यशोधर म्हणतो– आपीड काड्यांच्या सहाय्याने गोलाकार बांधल्या जातो.[४०]

अलका नगरीच्या युवतींचे वर्णन करतांना कालिदास म्हणतो –

हस्ते लीला कमलमलके बालकुन्दातुविद्धं
नीता लोध्रप्रसवरजसा पाण्डुतामानने श्रीः।
चूडापाशे नव कुरबकं चारु कर्णे शिरिषं

सीमन्तो च त्वदुपगमजं यत्र नीपं वधूनाम्।।[४१]

'चूडापाशे' या शब्दावरून ही केशरचना त्याकाळी स्त्रिया करीत असत.

**धम्मिल बन्ध –**

धम्मिल बन्ध असा केशभूषेचा उल्लेख बुद्धघोषाच्या 'पद्यचूडामणि' या ग्रंथात आला आहे. अमरकोषाचा दाखल देऊन टीकेत म्हटले आहे. ''धम्मिल्ल: संयता: कचा: इत्यमर:।[४२]

अन्त: समाावेशितफुल्लमल्ली धम्मिल्लबन्धस्तरलेक्षणाया:।

ततान तारागणशारितस्य गाढान्धकारास्तबकस्य कान्तिम्।।[४३]

हर्षचरितात यशोवतीची बेला नावाच्या दासीने धम्मिल केशरचना केल्याचा उल्लेख आहेत.[४४] अजन्ताच्या पुष्कळ चित्रात धम्मिल असा उल्लेख आढळतो.

**वेणी –**

वेणी हा प्राचीन भारतीय स्त्रियांची प्रिय केशरचना होती. विरहानंतर नायक नायिकेची वेणी घालत. वेणी घालण्यावरून भट्टनारायणाने आपल्या नाटकाचे नाव वेणीसंहार ठेवले.

पुरुषही केशभूषा करीत असत ह्याचा पुरावा नैषधीयचरितात पुढीलप्रमाणे आढळतो.

विभज्य मेरूर्न यदार्थिसत्कृतो न सिन्धुरुत्सर्गजलव्यवैर्मरू: ।

अमानि तत्तेन निजायशोयुगं द्विफालबद्धाश्चिकुरा: शिर:स्थितम्।।[४५]

केसांच्या कंगवाने दोन भाग करून भांग पाडला जायचा त्याला द्विफाल असे म्हटले आहे.

**केशभूषा (केशसज्जा) –**

केसांना धूप दिल्यानंतर केसांच्या विविध रचना केल्या जात. त्यानंतर केसाला दोन प्रकारे अलंकृत करीत (१) नैसर्गिक अलंकार (२) सुवर्णमौक्तिक निर्मित अलंकार

पूर्वी फुलांनी, माळांनी तर कधी सुवर्णमौक्तिकांच्या अलंकारांनी केसांना सजविले जात. कालिदासाच्या साहित्यात असे संदर्भ सर्वत्र विखूरलेले दिसतात. ऋतुसंहार या काव्यात तरुण स्त्रिया सर्वच ऋतूमध्ये

विविध फुलांनी आपला केशपाश कसा सजवितात ते पुढील वर्णनात दिसते–

शिरसि बकुलमालां मालतीभिः समेतां
विकसित नवपुष्पैर्युथिकाकुड्मलेन ।
विकचनवकदम्बैः कर्णपुरं वधूनां
रचयति जलदौघः कान्तवत्कालएषः ।।[४६]

मेघदूतात अलकानगरीचे ऋतुवैभव वर्णन करताना कालिदास येथील स्त्रियांचा पुष्पश्रृंगार शब्दांकित करतो.

कन्हेर (कर्णिका), कोरांटी (कुटबक), मल्लिका (जाई), मालती, केसर (बकुळ), अशोक, केतकी इत्यादी फुलांचा केसात माळण्यासाठी उपयोग होत असे असा उल्लेख ऋतुसंहारात अनेक वेळा आला आहे.

विवाहसमयी पार्वतीने आपल्या केशपाशावर पांढऱ्या मधुक पुष्पाची माळा बांधली होती.

पर्याक्षिपत् काचिदुराबबन्ध पूर्वावता पाण्डुकमधूकदाम्ना।।[४७]

शकुन्तलेच्या विवाहसमयी अनसूया तिला केसरमाला देते. मंगल समालंभन म्हणून कोवळ्या दुर्वा केसात धारण करण्याचा उल्लेख शाकुंतलात आला आहे.[४८]

अलकानगरीत तरूण वधू हातात सुंदर कमळ तर, वेणीत कुंदफुले गुंफतात, आपल्या मुखावर लोध्रपराग लावतात तर अंबाडयावर कोरांटीची फुले माळतात. कानावर शिरिषफुले खोवतात तर भांगात कंदब्याची फुले धारण करतात.[४९] अशाप्रकारे त्याकाळी स्त्रिया फुलांनी केसांना अलंकृत करीत

फुलाशिवाय केसात मोत्याच्या माळा धारण करीत. फुले सर्व ऋतूत उपलब्ध नसत त्यामुळे पर्याय म्हणून मोत्याच्या माळा धारण करीत असावे कदाचित माळेमुळे माळणे हे क्रियापद रूढ झाले असावे. मेघदूतात अलकानगरीचे वर्णन करताना कालिदास म्हणतो.

'एखाद्या कामिनीने केसात मोत्याची जाळी धारण करावी तसे अलकानगरी वर्षाकाळी आपल्या डोक्यावर जलबिंदूनी युक्त अशा मेघमालेला धारण करते.'[५०] ऋतुसंहारातही मौक्तिकमालेचा उल्लेख केशभूषा म्हणून अनेकदा आला आहे. हा प्रकार आजही अस्तित्वात आहे.

वरील सर्व वर्णनावरून ऋतुकालोद्भव फुलांनी केसाला अलंकृत करण्याची पद्धत संस्कृत साहित्यात सर्वत्र दिसते. त्यात केसाला सुशोभित करण्यासोबत सुगंधित करणे हाही हेतू असावा. आज फक्त केसात फुले माळण्याची परंपरा टिकून आहे पण पूर्वी केसाशिवाय भांगात, कानावर ही फुले खोवत आज कुंकवाने भांग भरण्याची पद्धत आहे. पण पूर्वी फुलांनीही भांग भरत असत. फूले गुंफण्याच्या कलेला ६४ कलांमध्ये महत्त्वाचे स्थान होते.

संस्कृत साहित्यातील केस प्रसाधनाचा सांगोपांग विचार केला असता पुढील निष्कर्ष हाती येतात.

(१) रसाकर कोष, कामसूत्र, बृहत्संहिता, मानसोल्लास, चरकसंहिता, शारंगधरपद्धती इत्यादी संस्कृत शास्त्रग्रंथावरून आणि संस्कृत साहित्यातील अत्र तत्र विखुरलेल्या संदर्भावरून प्राचीन काळी केशप्रसाधनाला महत्त्वाचे स्थान होते असे दिसते.

(२) केशप्रसाधनात केशरक्षण, केशसमस्या निवारण, केशरंजन, केशरचना आणि केशभूषा (केशसज्जा) ह्या सर्व गोष्टींचा समावेश होत असे.

(३) वैदिक काळापासून भारतीय केसांविषयी जागृत होते.

(४) प्राचीन काळी स्त्रीपुरुष दोघेही केस राखत. स्त्रियांच्या केशरचनेचे विविध प्रकार अस्तित्वात होते याचा उपोद्बलक पुरावा प्रसिद्ध प्राचीन शिल्पावरून मिळतो.

(५) स्त्रियांच्या सोळा शृंगारात केसरचनेला आणि फुले, गजरे आणि अलंकारांची केशसज्जा करणे ह्या दोन्ही गोष्टींना महत्वाचे स्थान होते.

(६) केस लांब, दाट आणि मजबूत असण्याकडे पूर्वजांचा कटाक्ष होता. काळे केस हे सौंदर्याचा मापदंड होता त्यामुळे केस काळे करणारे कलप, केसांच्या वाढीसाठी वेगवेगळे तेल, लेप, केसविषयक समस्येवरील उपाय ह्यांचे शास्त्रीय चिंतन आमच्या वैद्यक शास्त्राने केले आहे. या चिंतनाची सुरुवात वेदकाळापासून झालेली दिसते.

(७) आज केसांच्या आरोग्यासाठी तेलाचा वापर होत असला तरी प्राचीन काळचे केशधूपन आजच्या गतिमान जीवनशैलीत जवळपास नष्टप्राय झाले आहे. त्याची जागा केशशोषक (Hairdryer) ने घेतले आहे.

(८) आज दैनंदिन जीवनात केशसज्जेचे महत्त्व लुप्तप्राय झाले असले तरी विवाहादी समारंभात या प्राचीन परंपरेचे जतन सर्वत्र केले जाते. केशसज्जेची प्राचीन परंपरा दक्षिण भारतात आजही जिवंत आहे.

(९) आधुनिक काळानुसार केशरचनेचे विविध प्रकार अस्तित्वात आले आहे. आजच्या गतिशील जीवनातही प्रत्येक स्त्री प्रसंगपरत्वे अनुरूप केशरचना करताना दिसते. त्यासाठी प्रसाधिकांचे साहाय्य घेतले जाते. तात्पर्य आज तपशिल बदलला आहे पण तत्त्व तेच आहे.

(१०) प्राचीन केशप्रसाधनात वापरण्यात येणारे वनस्पतीजन्य तेल, लेप, कलप(आयुर्वेदिक) जाऊन त्यांची जागा शाम्पु, हेअरडाय, जेली इत्यादी घातक आणि रसायनयुक्त प्रसाधनांनी घेतली. अस्सल भारतीय नैसर्गिक उपचारांची (आयुर्वेदिक औषधांची) घरगुती परंपरा क्षीण होत आहे त्याचे पुनरुज्जीवन करणे आवश्यक आहे.

(११) पूर्वीचे केशरचनेचे संकेत आज पूर्णपणे बदलले आहेत. जसे पूर्वी एक वेणी धारण करणे, केस मोकळे सोडणे हे विरहिणी, दुःखी स्त्रीचे लक्षण होते. आज वेण्या फक्त शालेय जीवनात सक्तीच्या

केल्यामुळे विद्यार्थिदशेतच घातल्या जातात. महाविद्यालयीन युवती केस मोकळे सोडतात, छोटे कापतात अथवा कापून विविध केशरचना करतात.

(१२) विवाहादी प्रसंगात मात्र आम्रातक (आंबाडा), चूडापाश (जुडा) इत्यादी प्राचीन केशरचनेला आजही महत्त्व आहे.

(१४) आज युवतींमध्ये मेहंदी, कलप इत्यादींच्या सहाय्याने संपूर्ण केस रंगविणे, लटा रंगविणे (Highlights) केस कुरळे करणे किंवा सरळ करणे आणि तेलाचा फारसा वापर न करणे इत्यादी प्रचलन दिसते.

-----

**संदर्भसूची -**

---


१. उत्तरमेघ ११
२. Journal of I. S. of O.A. Ed. Page No.105
३. चरक संहिता
४. चरक संहिता
५. अथर्व ६/१३६-३७
६. अथर्व ६/.१३७.३
७. ''रेवती रनाधृष: सिषासव: सिषासथ। उतस्थ केशहणीरथसे इ. केशवर्धनी:।।३।।'' (६/२१)
८. कृत्रिम: कण्टक: शतदन्य एष:। अपास्या: केश्यं मलमप शीर्षण्यं लिखात्।१४/२/६८
९. शिरसि विधृता नित्यं स्नेहेन परिपालिता।
केशा: अपि विरज्यन्ते नि:स्नेहा किं न सेवका:।।४१।। पंचतत्र मित्रभेद
१०. चरक सू.अ.५/८१ ते ८३
११. बृहत् ७७/१३-१४
१२. तत्रैव
१३. शार्ङगधर १९/११
१४. तत्रैव २३/११
१५. तत्रैव २६/११
१६. तत्रैव १३
१७. तत्रैव ३५/३९
१८. अनंगरंग पृ.१७२

१९. शार्ङगधर १९/४४
२०. पूर्वमेघ ३५
२१. ऋतु ५/१२
२२. बृहत १२
२३. मानस ३/१९/१७००
२४. तत्रैव
२५. अग्नि - अ/ भोजन विधान
२६. धन्वन्तरी ६/१२८
२७. विक्रमांक १/४
२८. कांदबरी पृ.४१
२९. तत्रैव
३०. बृहत १-७७
३१. बृहत १/७८-७९
३२. शिल्पशास्त्रे आयुर्वेदः १७-२०
३३. तत्रैव २२-२५
३४. रामायण ५/६५/३
३५. नाट्यशास्त्र अ. २३/६७-६८
३६. उत्तरमेघ ५
३७. ऋग्वेद ७/३३/१
३८. तत्रैव १०/११४/३
३९. वा.रामायण
४०. कामसूत्र १/३ पृ.८७-८८
४१. उत्तरमेघ ५
४२. पद्यचूडामणि पृ.८७
४३. सर्ग ४
४४. कादंबरी पृ.
४५. नैषध
४६. ऋतु २/७
४७. कुमार ७/१४
४८. शांकुतलअंक ४
४९. उत्तरमेघ ५
५० पूर्वमेघ ६३

## प्रकरण चौथे

# संस्कृत साहित्यातील अलंकरण

शुचिना भूषणं धार्यं दिव्यरत्नविनिर्मितम् ।
रत्नाधिदेवतास्तुष्टा यच्छन्ति महतीं श्रियम् ।।

दिव्य रत्नापासून बनविलेले अलंकार पवित्रतापूर्वक धारण केल्याने रत्नाच्या अधिष्ठात्री देवता संतुष्ट होऊन फार मोठे वैभव बहाल करतात.

मानसोल्लास

# प्रकरण चौथे
# संस्कृत साहित्यातील अलंकरण

जगातील कोणताही समाज असो प्रत्येक स्त्री-पुरुष कोणत्या ना कोणत्या स्वरूपात अलंकार किंवा भूषण यांचा वापर करतात. अगदी आदिम काळापासून मानव समाजात अलंकार वापरण्याची चाल आहे. आदिमानव वाळलेलं गवत, वेली, विविध बिया, फळे, हाडे इ. वस्तूंनी स्वत:ला सुशोभित करी. आजही पोवळी, कवड्या, शंख काचेचे मणी इ. अलंकार वन्य जमातीत मुक्त हस्ताने वापरले जातात. अनेक जमातीत निसर्गातील पाने फुले यांचा वापर लोकनृत्याच्या वेळी करतात. असेच पूर्वी भिल्ल स्त्रिया गुंजाफलांचे हार वापरीत असा उल्लेख संस्कृत वाङ्मयात आढळतो. उदा. कि जातु गुज्जाफलभूषणांना सुवर्णकारेण वनेचराणाम् ।।[१] (१.२५ विक्रमांकदेवचरितम्) गुंजाफळाचे अलंकार घालणाऱ्या वनवासींना सोनाराचे काय काम?

असा अगदी महाराष्ट्राचा विचार केला तर कितीतरी अलंकार नजरेसमोर येतात. अलंकाराच्या नावावरून ते शरीराच्या विभिन्न भागावर धारण केले जाते असे लक्षात येते. जसे कंठी कंठात, कुंडले कानात, पैंजण पायात इ. शरीराच्या विविध अवयंवावर अलंकार धारण करण्याचा उद्देश काय असावा? याचे उत्तर अमर कोषात मिळते.

अलंकार या शब्दांत अलम् आणि कार असे दोन शब्द एकत्र आले आहेत. अर्थात ''अलं करोति इति अलंकार:'' असा त्याचा विग्रह होईल. अमर कोषात अलम् या शब्दाचे चार अर्थ दिले आहेत.[२] भूषण, पर्याप्ती, शक्ती आणि वारण हे ते चार अर्थ होय. अर्थात अलंकार या शब्दाचा अर्थ भूषण असा होतो. अलंकाराला आभरण, मंडण, अवतंस असेही पर्यायी

शब्द आहेत. या सर्वाचा अर्थ भूषविणे असा होता अर्थात सुशोभित करण्यासाठी वापरावयाच्या सर्व वस्तूंना अलंकार असे म्हणतात.

**सुशोभन –**

शरीराच्या त्या त्या अवयवाला सजविणे आणि त्या द्वारा इतरांचे आपल्याकडे लक्ष वेधणे हे अलंकारांचे कार्य होय. तसेच त्या त्या अवयवांचे सौंदर्य प्रकट करणे, स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाला विशेषत्वाने प्रस्तुत करणे हा अलंकाराचा हेतू आहे. आत्मप्रकाशन, शालिनता इत्यादी हेतूने अलंकारांची निर्मिती आणि विनियोग होऊ लागला. पण काही विद्वानांच्या मते केवळ सौंदर्यवर्धन हाच अलंकारांचा उद्देश नव्हे. अमरकोषाने अलंकारासाठी दिलेल्या सर्व पर्यायी अर्थाचा विचार करू.

**रक्षण(शक्ती) –**

थंडी, वारा, पाऊस अशा आधिभौतिक संकटापासून रक्षण करण्यासाठी आपण जसा वस्त्रांचा वापर करतो, तसा भूत, प्रेत, ग्रह–नक्षत्र इत्यादी आधिदैविक संकटापासून स्वत:चे रक्षण करण्यासाठी आदिम काळापासून अलंकाराचा उपयोग होऊ लागला. पुढे कालांतराने त्यात कलात्मकता येऊन त्याच्या मौलिकतेत भर पडली आणि संस्कृतीच्या विकासासोबत त्याचा उपयोग सौंदर्यवर्धनासाठी होऊ लागला.

रत्नासारखे किंमती खडे धारण करण्याचा हेतू दृष्ट शक्तीपासून स्वत:ला वाचविणे हा होता. आज एकविसाव्या शतकाकडे वाटचाल करणाऱ्या समाजातही हा हेतू दिसून येतो. विशिष्ट ग्रहांच्या पीडेपासून वाचविण्यासाठी किंवा त्यांचा ताप कमी करण्यासाठी अनेक लोक गोमेद, पोवळं, रत्न इत्यादी अलंकारात जडवून धारण करतात. कोणत्या रत्नाचा कोणत्या ग्रहाशी संबंध आहे हे पुढील तक्त्यावरून लक्षात येईल.[३]

| **रत्न** | **ग्रह** |
|---|---|
| माणिक | सूर्य |
| मुक्ता(मोती) | चन्द्र |
| प्रवाळ (पोळं) | मंगल |

| | |
|---|---|
| ताक्ष्य (पाचू) | बुध |
| पुषपराग (पुखराज) | गुरू |
| वज्र (हिरा) | शुक्र |
| इन्द्रनील (नीलमणी) | शनि |
| गोमेध | राहू |
| वैडूर्य (बिडालाक्ष) | केतू |

ह्या शिवाय वैक्रान्त, सूर्यकान्त, चन्द्रकान्त, राजावर्त, पेरोज, स्पटिक,व्योमाश्म, बदराश्म, पालंक, रूधिर, पुत्रिका, सुगंधित, तृणकान्त ही तेरा उपरत्ने आहेत.[४]

वरील तक्त्यावरून लक्षात येते की हजारो वर्षापासून रत्नादी अलंकार धारण करण्यामागचा लोकविश्वास आजही कायम आहे आणि हा लोक विश्वास 'अलंकार' या शब्दातच दडलेला आहे.

**पर्याप्ती –**

अमर कोशात दिलेल्या अलंकार शब्दाचे तीन अर्थ पर्याप्ती, शक्ती आणि वारण असेही दिले आहेत. अलंकार घालणे म्हणजे दुष्ट शक्तीला 'अलम्' (पूरे) अशी मर्यादा निर्माण करणे हेय. दुष्ट शक्तीला थोपविणे, अडविणे हा अलंकाराच्या मागे लोकविश्वास आहे हे तत्त्व प्रसिद्ध संशोधक डॉ. स. अं. डांगे ह्यांनी आपल्या संशोधनातून मांडले आहे. डॉ. डांगे म्हणतात –'' परिभूषित किंवा अलंकृत होण्यात दृश्य सौंदर्य नाही तर अदृश्य शक्तीचे वलय आहे हे ध्यानात घेणे आवश्यक आहे.[५] पुढे ते म्हणतात – ''दैनंदिन संस्कार, भस्मलेप, तिलकादि अलंकार हे दुष्ट शक्तींना दूर ठेवण्यातून म्हणजेच दैवी शक्तीचे वलय निर्माण करण्याच्या भावनेतून आले आहे. त्यांच्या मते हा लोकविश्वासाचा पुरावा सुश्रुत संहितेत आढळतो. ''रक्षाभूषणनिमित्तं बालस्य कर्णो विध्येते।''[६] याचा अर्थ मुलाचे कान अलंकार घालण्यासाठी न टोचता ह्या अवयवाच्या रक्षणार्थ 'रक्षाभूषण' ठेवण्यासाठी टोचतात. कर्णाच्छेदन असो वा नासिकाच्छेदन

असो. त्या त्या अवयवाचे रक्षण करणे ही भावना, लोकविश्वास त्या अलंकाराच्या पाठीमागे असतो.

वेद काळात रूक्म अलंकार वापरण्याचा प्रघात होता त्याचा उल्लेख पुढे येईलच. सूर्याला रूक्म असेही म्हणतात. म्हणजे रूक्म हा अलंकार सूर्याचे प्रतीक म्हणून वापरीत. म्हणजे सूर्याच्या रक्षक शक्तीची कल्पना ही त्यामागे आहे. असे डॉ. डांगे यांचे म्हणणे आहे.[७] जीवितांचे सरंक्षण, देवतांची कृपा भूतपिशाच्यांचे निराकरण असे अनेक हेतू त्याच्या मूळाशी दिसतात.

परिहस्त वि धारय योनिं गर्भाय धातवे।
मर्यादे पुत्र मा धेहि तं त्वमागमयागमे।।२।। कांड ६/सूक्त ८१

अथर्व वेदात अथर्व ऋषींनी कंकणाला उद्देशून वरील मंत्र म्हटला आहे. त्यावरून स्त्रियांच्या कंकणांचा संबंध गर्भाशयाशी आहे अशी धारणा स्पष्ट होते. कंकणामुळे (परिहस्त) गर्भाशय गर्भधारणेस योग्य होते, उत्तम संतान प्राप्त होते, सुखप्रसुती होते आणि कंकण प्रजा व धनाचे ग्रहण करणारे आहे असे ऋषी म्हणतात.

सौष्ठवयुक्त शरीरात देवांची वसती असते तर रोगग्रस्त शरीर पिशाचांचे माहेरघर असते अशी समजूत आहे म्हणून आपले शरीर भूषवून त्यात देवतांचे वास्तव्य घडवून आणणे व त्या देवतांच्या द्वारे भूताखेतांना पळवून लावणे असा अलंकारांचा गभितार्थ होतो. याच हेतूमुळे अलंकारात प्रतीके शिरली. अलंकाराचा संबंध जादूविद्येशीही थोडाबहुत आहेच. सामान्यत: शरीरावरचे सर्व अलंकार ताईतवजा असतात. पूर्वी मुलांच्या गळ्यात वाघनखे घालण्याची पद्धत होती. दृष्टबाधा, ग्रहबाधा होऊ नये, जादूटोण्याचा प्रभाव होऊ नये असा उद्देश त्यामागे असतो. सौभाग्य चिह्नांच्या सर्व दागिन्याच्या पाठीमागे हीच भावना आहे. भारतीय संस्कृत कोषातही म्हटले आहे की, विवाहित स्त्रिच्या गळ्यात बांधले जाणारे मंगळसूत्रही अलंकारापेक्षा संरक्षण याच भावनेने आलेले आहे. लग्नातली अंगठीही मूळात सरंक्षक म्हणून वधूच्या बोटात घातली गेली''[८]

**वारण –**

बहुतेक अलंकारात एक मजेदार साम्य आढळते ते म्हणजे अलंकार गोलाकार असतात मग ते हातात घालायच्या मनगट्या असो अथवा पायातले वाळ्या किंवा पैजण असो, हातातील तोडे असो, पायातील जोडवे असो, कमरेतील मेखला असो, वा गळ्यातील हार असो वलयाकार हे बहुतेक दागिन्यांचे स्वरूप! त्यामागे हाच लोकविश्वास असावा की त्या अवयवाला रिंगण घालून बंदिस्त करून अशुभ शक्तीपासून त्याचे निवारण करणे. पूर्वीपासून अवयवाचे रक्षाकवच म्हणून तो तो दागिना धारण करीत, मात्र पुढे यात नक्षीकाम आले विविध आकार, प्रकार आले आणि पुढे अलंकार शोभाक्षेत्रातच समाविष्ट झाले.

**प्रतिष्ठा –**

अलंकाराचा दूसरा महत्त्वाचा उपयोग किंवा विशेष उपयोग म्हणजे आपली सामाजिक प्रतिष्ठा किंवा आर्थिक सुबत्ता प्रकट करणे. विवाहादी सामाजिक प्रसंगात, मंगल उत्सव प्रसंगी अलंकाराद्वारा आपली प्रतिष्ठा मिरविणे हा हेतू असतो तसेच चारचौघात आपल्या व्यक्तिमत्त्वातील सौंदर्य खुलविणे, शालीनता प्रकट करणे हा हेतू वर प्रकट केला आहेच.

**मांगल्यचिह्न –**

अलंकार हे मांगल्याचे सूचक आहे त्यामुळे सण उत्सवाचे मांगल्य प्रकट करणे हा ही अलंकारांचा हेतू आहे. एखाद्या प्रसंगात अलंकार धारण न करणे उपेक्षेला कारण होऊ शकते. एखाद्या शुभप्रसंगी अनलंकृत असलेल्या स्त्रिला लंकेची पार्वती म्हणून हिणविल्या जाते. याचाच अर्थ अलंकार केवळ प्रतिष्ठासूचक नव्हे तर मांगल्यसूचक असतात हे सिद्ध होते.

**सौभाग्यचिह्न –**

काही निवडक अलंकार समाजात सौभाग्यसूचक मानले गेले आहे जसे महाराष्ट्रात मंगळसूत्र, गुजरातेत नथनी, बंगालमध्ये हस्तीदंती बांगड्या इत्यादी. विवाहित स्त्रिने ते विशिष्ट अलंकार धारण करायलाच हवे असा अलिखित दंडक सामाजिक शिष्टाचाराचा भाग बनला आहे. वैदिक काळी

प्राचीन भारतीयांना वस्त्रापेक्षा अलंकाराचे अधिक आकर्षण होते. वस्त्रासारखी ही मूलभूत गरज नव्हती. त्याचा उद्देश नटणे, मुरडणे, शरीर सुशोभित करणे हाच होता. त्याकाळी स्त्री पुरुष, कर्णशोभन (श्रुतिमणि), हिरण्यकर्ण (सुवर्णकुंडल), निष्क (सुवर्ण हुमेल), मणिग्रीव (रत्नमाला), रुक्म (चौकी), खादि (हात,पाय आणि बाहू भूषण/वलय), ऋष्टि (स्कन्धाचे आभूषण), शिप्र (मुकुट /टोप), ओपस (शिरोभूषण) इत्यादी अलंकार धारण करीत.[९] हे अलंकार मणिकांचन योगाने म्हणजे सोने आणि रत्न यांच्या संयोगाने घडवत. या अलंकाराविषयी वेदकाळी अपार आकर्षण असावे असे पुढील ऋचेवरून वाटते. ही ऋचा कुरुसुति ऋषीनी इन्द्राची प्रार्थना करताना म्हटली आहे.

हे शत्रुनाशक इन्द्रा, तू वसू (धन) आहेस, तू (सर्वत्र) ऐकिवात आहेस. (तुझी कीर्ती पसरली आहे.) आमच्यासाठी तू कर्णशोभन प्रदान कर.''[१०]

महर्षी कक्षीवान प्रार्थना करताना म्हणतात -''हे विश्वदेवांनो आम्हांला हिरण्यकर्ण, मणिग्रीव तसेच सुंदर मुले द्या''[११]. या आणि अशा अनेक ऋचावरून वैदिक ऋषींनी अलंकाराची आवड लक्षात येते. त्यांनी सुवर्णकुंडले मणिग्रीव इत्यादी अलंकार सुंदर मुलाइतके प्रिय होते.[१२]

वैदिक ऋषींनी केलेल्या विविध देवतांच्या वर्णनावरून त्याकाळी प्रचलित असलेल्या अलंकारावर प्रकाश पडतो. वसिष्ठ ऋषी म्हणतात - सुंदर आयुध धारण करणारे, स्फूर्तिवान् सुंदर निष्क धारण करणारे मरुद्गण स्वत: आमचे शरीर सजवतात.''[१३] त्यांनी खांद्यावर खादि आणि वक्षस्थळावर रुक्म (अंसेष्वाखादयो वो वक्ष:सु रूक्मा) धारण केले आहे. असा या अलंकाराचा पुढे उल्लेख केला आहे.[१४]

रामायणातही चूडावलय, चूडामणि, विभिन्नंन प्रकारचे कुंडल, मोती आणि सुवर्णरत्नांचे हार, माळा निष्क, ग्रैवेयक, अंगद, केयूर, अंगठी, करधनी, नूपुर इ. अनेक आभूषणांचा उल्लेख आहे. रावण पळवून नेत  असताना सीतेने आपली आभूषणे ऋष्यमुख पर्वतावर टाकल्याचा उल्लेख

आहे. त्यावरून स्त्रिया बाजूबंद, कुंडल आणि नुपूर धारण करीत असे लक्षात येते.[१५] वनगमनाच्या वेळी दशरथाने सीतेला चौदा वर्षे पुरतील इतकी वस्त्रे आणि अलंकार दिले.[१६] केवळ मनुष्य नव्हे तर वानर आणि राक्षसांनी धारण केलेल्या आभूषणाचा उल्लेख रामायणात आढळतो. वालीजवळ इन्द्राने दिलेली रत्नजडित सुवर्णमाला होती.[१७] 'शक्रदत्ता वरामाला काचनी रत्नभूषिता।'[१८] रावणाच्या कंबरेभोवती फार मोठा कंबरपट्टा होता. 'श्रोणिसूत्रेन महता मेचकेन सुसंवृत्तः।' तरुण सूर्याप्रमाणे तेजस्वी कर्णकुण्डलांनी तो विभूषित होता 'तरुणादित्य वर्णाभ्यांकुण्डलाभ्यां विभूषितः।'[१९] याचा अर्थ वस्त्राइतकेच आभूषणांनाही महत्त्व होते.

महाभारतात सभापर्वात देवसभेचे वर्णन आहे. त्यात मूल्यवान वस्त्रभरणे धारण केलेल्या विविध देवतांचे वर्णन आहे.[२०] ते वर्णन केवळ कल्पनाश्रित नसून त्यावरून त्याकाळात समाजात प्रचलित अलंकाराच्या ज्ञानावरून व्यासांनी देवांचे वर्णन केले असावे. या अलंकारात प्रामुख्याने किरीट, अंगद (बाजूबंद) कुण्डल, माला यांचा उल्लेख वारंवार आला आहे.

कालिदासाच्या मेघदूतात स्त्रियांच्या बांगड्याच्या प्रकारांचा उल्लेख वलयकुलिश, शिञ्जावलय या दोन रूपात आला आहे.[२१] स्त्रियाप्रमाणे पुरूषही सुवर्णकंकण धारण करीत असत. याबाबत मेघदूतात यक्षाचा 'कनकवलयभ्रंशरिक्तप्रकोष्ठः'[२२] हा उल्लेख बोलका आहे. याशिवाय शांकुतल नाटकात कनकवलयं स्त्रस्तं स्त्रस्तं मया प्रतिसार्यते विवर्णमणिकृतम्[२३] असे दुष्यन्त स्वतःच्या विरही अवस्थेबद्दल बोलतो. यावरून त्याचे सुवर्णकंकण रत्नजडित असे लक्षात येते. याशिवाय मुकुट, शिरोभूषण, अंगद, बाहूभूषण अंगठी आणि सुवर्ण मौक्तिकांच्या माळा पुरूष धारण करीत आणि स्त्रिया पायात नुपूर, कमरेत कांचीगुण त्याला मांडीवर येतील अशी मोत्यांची जाळी, मोत्याचा कण्ठा, एकदाणी आणि कर्णभूषण असे विविध दागिने धारण करीत त्यांचा उल्लेख सर्व संस्कृत साहित्यात आला आहे. विशेषतः ऋतुसंहारात पानोपानी आला आहे.

पद्मपुराणात कुंजलकृत स्तोत्रात श्रीकृष्णाचे हे सालंकृत रूप वर्णिले आहे.[२४]

सूर्यतेज: प्रकाशाभ्यां कुण्डलाभ्यां प्रभाति च।
श्रीवत्साङ्केन पुण्येन सर्वदा राजते हरि:।। ८८
केयूरकङ्कणैर्हरि: मौक्तिकैर्ऋक्षसन्निभै:
वपुषा भ्राजमानस्तु विजयो जयतां वर: ।। ८९
राजते सोऽपि गोविन्दो हेमवर्णेन वाससा।
मुद्रिकारत्नयुक्ताभिरङ्गुलीभिर्विराजते।। ९०

या स्तोत्रात कुंडल, केयूर, कंकण, मोत्याचा हार आणि मुद्रिका या पाच अलंकारांचा उल्लेख आहे.

रत्नावली नाटकात मदनोत्सवाच्या आनंदात नाचत नाचत येणाऱ्या दासींच्या समूहाचे राजा वर्णन करतो. त्या वर्णनात केसात माळलेले फुलांचे गजरे, पायातील नुपूर, नृत्यामुळे सतत उरोजवर हलणारे हार याचा उल्लेख आला आहे. याचा अर्थ हार, गद्रे, नूपुर हे अलंकार नोकरवर्गही धारण करीत असत.

स्रस्त:स्रग्दामशोभां त्यजति विरचितामाकुल: केशपाश:
क्षीबाया नूपुरौ च द्विगुणतरमिमौ क्रन्दत: पादलग्नौ
व्यस्त: कम्पानुबन्धादनवरतमुरो हन्ति हारोऽयमस्या:
क्रीडन्त्या: पीडयेव स्नतभरविनमन्मध्यभङ्गानपेक्षम्।।[२५]

जयदेवाच्या गीतगोविंदात राधेच्या अलंकाराच्या तेजाने भरलेल्या कुंजात हरी आलेला पाहून लाजलेल्या राधेचे चित्र कवीने उभे केले आहे.

हारावलीतरलकाञ्चनकाञ्चिदाम केयूरकङ्कणमणिद्युतिदीपितस्य। द्वारे निकुंजनिलयस्यहरिं निरीक्ष्य क्रीडावतीमथ सखी निजगाद राधाम्।।[२६]

वरील वर्णनात अनेक सरांचा मोत्याचा हार, सोन्याचा कमरपट्टा, केयूर, रत्नजडित कंकण यांचा उल्लेख आला आहे. साधारण सर्वच स्त्रिया हे अलंकार घालत असावेत. 'मणिमयमकरमनोहरकुण्डल –मण्डितगण्डमुदारम्' असे कृष्णाचे वर्णन गीतगोविंदात आले आहे.[२७] याचा अर्थ पूर्वी

मकराच्या आकृतीचे कुंडल लोकप्रिय अलंकार असावा. तेराव्या शतकातील बुद्धघोषाने आपल्या सिद्धार्थचरितम् या महाकाव्यात नायिकेच्या अलंकारांचे वर्णन करताना मोत्याच्या कुंडलांचा पुढील उल्लेख केला आहे.

अलंकृतं मौक्तिककुण्डलाभ्यामम्भोरुहाक्ष्या मुखमार्द्रहासम्।
पार्श्वद्वयावस्थितपुण्डरीककोशं शरद्कोकनंद जिगाय।।[२८]

कमलाप्रमाणे नेत्र असलेल्या त्या राजकन्येचे गोड हास्य असलेले मुख मोत्यांच्या कुंडलांनी असे काही शोभू लागले की वाटे दोन पांढऱ्या कमळांमध्ये एक लाल कमळच शोभत आहे.

विलोलस्तनभारहारा,मणिक्यकाञ्चीवलयानुविद्धश्रोणीभारा,ायुक्तमुक्ता सरदर्शनीयकण्ठा इत्यादी विशेषणांनी सिद्धार्थाच्या नववधूचे वर्णन बुद्धघोषाच्या पद्यचूडामणित आले आहे. यावरून त्या काळच्या अलंकारांचे प्रचलन कळते.

बाणभट्टाने कादंबरीत नायिकांच्या श्रृंगाराच्या वेळी त्यांना सालंकृत रूपात वर्णिले आहे. त्यावेळी वरील सर्व दागिन्यांचा उल्लेख आढळतो.

**नैसर्गिक अलंकार –**

प्राचीन काळी निसर्गात उपलब्ध असलेल्या पाने, फुले, कोवळे अंकुर यांनी शरीराला अलंकृत करण्याची पद्धत होती. फूल गुंफण्याच्या कलेला ६४ कलांमध्ये महत्त्वाचे स्थान होते. कानात फुले खोवण्याचा उल्लेख संस्कृत साहित्यात अनेकदा येतो. कमळे, आम्रमंजरी, अशोकपुष्प, शिरिष पुष्प इत्यादी फुलांचा कर्णभूषण म्हणून वारंवार उल्लेख येतो. कर्णावसक्ताः कमलेक्षणया यवाङ्कुराः सातिशयं विरेजुः। (सिद्धार्थचरितम् ४/१३) याचा अर्थ विवाहाच्या वेळी यवांकुरासारख्या कर्णभूषणाला महत्त्वाचे स्थान असावे असे दिसते. वसंतसेनेने कानावर कदंबपुष्प धारण केल्याचा उल्लेख मृच्छकटिक नाटकात आहे.[२९] केवळ उच्चभ्रू श्रीमंत स्त्रियाच नव्हे तर श्रमजीवी स्त्रियाही असा फुलांचा शृंगार करीत असा उल्लेख मेघदूतात आहे.[३०] कारण तो सहज उपलब्ध असे. ऋतुसंहारात कालिदासाने  कामिनीचा वर्षाकालीन कुसुमश्रृंगार वर्णिला आहे. केवळ स्त्रिया नव्हे तर

पुरूषही फुलांचे हे कर्णभूषण धारण करीत असत. कादंबरीत ऋषिकुमार पुंडरिकाने कानावर पारिजात मंजरी धारण केली आहे.[३१]

आज फक्त केसात फुले माळण्याची परंपरा टिकून आहे पण पूर्वी केसाशिवाय भांगात, कानावर ही फुले खोवत फुलांनी भांग भरत असत.[३२] गळ्यात सुगंधी फुलांच्या माळा घालत.

युवतीमध्ये हातात फुल धारण करण्याची पद्धत रूढ होती.[३३] आजही देवतेच्या मुर्तीच्या हातात फूल आढळते. ते त्याच परंपरेचे प्रतीक आहे.याला राजानक रूय्यक याने त्याला प्रकीर्ण अलंकारात समाविष्ट करून त्याला 'निवेश्य' अलंकार म्हटले आहे.[३४]

वरील सर्व वर्णनावरून ऋतुकालोद्‌भव फुलांनी शरीराला अलंकृत करण्याची पद्धत संस्कृत साहित्यात सर्वत्र दिसते. त्यात शरीराला सुशोभित करण्यासोबत सुगंधित करणे हाही हेतू असावा.

भारतवर्षात प्राचीन काळापासून तरुण-तरुणी विविध हारांनी, फुलांनी शरीराला सजवित. आज त्याचे अवशेष आजही भारतीयांच्या जीवनातील महत्त्वाच्या मंगल प्रसंगात दिसतात. जसे विवाहात हार, फुलांच्या मुडावळ्यांनी वधूवरांना सजवतात, डोहाळ जेवणात गर्भवतीला फुलांच्या दागिन्यांनी मढवतात. सत्कार प्रसंगी पुष्पहार गळ्यात घालतात. परंतु प्राचीन काळी दैनंदिन जीवनात तरुण तरुणी फुलांचे अलंकार धारण करीत असे दिसते. भरतमुनींनी अलंकाराचे चार प्रकार सांगितले[३५] -

(१) आवेध्य - अवयवाचे वेधन करून घातलेला अलंकार म्हणजे कानात फुले खोवणे.

(२) निबन्धनीय - बांधलेला अलंकार जसे अंबाडयावर गजरा बांधणे कमरेला फुलांची मेखला बांधणे.

(३) प्रक्षेप्य - हातात, दंडात गजरा घालणे इत्यादी.

(४) आरोप्य - गळ्यात हार घालणे. इत्यादी

हे विविध अलंकार कसे गुंफायचे, बनवायचे यावरून भरतमुनींनी त्याचे आठ प्रकार सांगितले.

(१) वेष्टित- जी माला संपूर्ण शरीराला झाकते किंवा गुडाळल्या जाते

(२) वितत - जी माला शरीराच्या एका भागात पसरलेली असते.

(३) संघाट्य - जी माला अनेक पुष्पसमुहाने गुंफली असते.

(४) ग्रंथिमत् - ज्या मालेत मध्ये मध्ये गाठी आहेत.

(५) अवलंबित - जी माळ लोंबती आहे. उदा. गळ्यातील लांब हार

(६) मुक्तक - जी केवळ एकाच प्रकारच्या फुलांनी गुंफलेली आहे

(७) मंजरी - काही वृक्षांची फुले मंजीरीच्या स्वरूपात असतात. जसे आम्रमंजरी ही कानावर धारण करीत असत.

(८) स्तबक - काही झाडांना फुलांचे घोस लागतात.जसे मधुमालती इ. स्तबक माळेच्या रूपात किंवा स्वतंत्र धारण करित असावे.

नाट्यशास्त्रातील वरील विवेचनावरून त्याकाळी अलंकाराविषयी पद्धतशीर चिंतन झाले होते असे दिसते. त्याकाळी वस्त्र धारण करण्याप्रमाणे अंगावर माळा धारण करणे हा दैनंदिन जीवनशैलीचा एक भाग होता. कामसूत्रामध्ये वर्णन केलेल्या ६४ कलांमध्ये देखील माल्यग्रथनविकल्पाः, शेखरकापीडयोजनम् ह्या दोन कला समाविष्ट केल्या आहेत हे वरील जीवनशैलीचे प्रतीक आहे.[३६]

वरील अनेक प्रकारावरून त्याकाळी माळाकाराच्या व्यवसायाला ऊर्जितावस्था असावी. त्याकाळी ह्या कलाकारांना खूप महत्त्व आले असावे असे वाटते.

सोमेश्वराने वस्त्रधारणानंतर माला धारण करावी असा आदेश दिला आहे. त्याला 'माल्योपभोग' असे नाव दिले आहे.[३७] माळा गुंफतांना चम्पक, मल्लिका, बकुळ मालती इत्यादी फुलांचा उपयोग होत असे. विविध फुलांच्या संगतीने शतपत्र कसे तयार करावे हे सोमेश्वराने सांगितले आहे. हे शतपत्र

अमरूक पाअल, मल्लिका फुलांचे गुच्छ यांनी तयार केलेले असे. असे शतपत्र राजा आपल्या मस्तकावर अथवा कंठात धारण करी.[३८]

वरील सर्व विवेचनावरून लक्षात येते की त्याकाळी सामान्य व्यक्तींना देखील फुलाच्या माळा प्रिय होत्या. शरीराला सुंदर व आकर्षित करण्याचे ते साधन होते. यात शरीरसौंदर्य वाढवण्यासोबत सुगंधाने घामाची दुर्गंधी दूर करणे हा हेतू असावा.

कामसूत्रात नागरकाच्या दिनचर्येत स्नानानंतर लेप लावल्यावर माळा धारण करायला हव्या असे सांगितले आहे.[३९]

**अर्थशास्त्र** –

खरे पाहता हा शास्त्रीय ग्रंथ आहे. पण त्या ग्रंथातही विभिन्न रत्न, मोत्यांची नावे त्यांचे उत्पत्तीची ठिकाणे रंग, आकार, प्रकार प्रत, परीक्षा इत्यादीचे विस्ताराने वर्णन केले आहे. त्याचबरोबर विविध अलंकाराची नावे ते तयार करण्याची पद्धत इत्यादीचे वर्णन आले आहे. त्यावरून प्राचीन काळी वापरण्यात येणाऱ्या अलंकाराच्या प्रकारावर प्रकाश पडतो. ते प्रकार पुढीलप्रमाणे आहेत.[४०]

मोत्यांचे हार –

१००८ पदरी हार –इन्द्रच्छन्द
५०४ पदरी हार–विजयच्छन्द
१०० पदरी हार–देवच्छद
६४ पदरी हार–अर्धहार
५४ पदरी हार –रश्मिकलाप
३२ पदरी हार–गुच्छक
२७ पदरी हार–नक्षत्रमाला
२४ पदरी हार–अर्धगुच्छक
२० पदरी हार–माणवक
१० पदरी हार–अर्धमाणवक

हाराप्रमाणे माळेचे प्रकारही अर्थशास्त्रात सांगितले आहेत.

केवळ दोऱ्यात ओवलेली मोत्यांची माळ 'एकावली',मध्ये रत्न गुंफलेली 'यष्टी', सोने आणि रत्नामध्ये जडलेली मौक्तिक माला म्हणजे

'रत्नावली', मोत्यांच्या मध्ये मध्ये काही अंतरावर सोने आणि रत्न गुंफलेली 'अपवर्तक', सुवर्णाच्या सूत्रात मध्ये मध्ये मोती घालून केलेल्या माळेला 'सोपानक' आणि मध्यभागी रत्न असलेली माळा 'मणि सोपानक' अशाच प्रकारचे डोके, हात, पाय, कटिप्रदेशावर घालण्याच्या विविध आभूषणासाठी त्याकाळी विविध नावे प्रचलित होती.[४१]

छोट्या मोत्यांच्या सराला मध्यभागी मोठा मोती लावला असेल तर त्याला 'शीर्षक' म्हणत. मध्ये मोठा मोती आजूबाजूला छोटे मोती असा क्रमाने सर बनला असेल तर त्याला 'उपशीर्षक' म्हणत. या छोट्या मोत्यांची संख्या चार असेल तर त्या सराला 'प्रकाण्डक'मध्ये मोठा मोती क्रमाने लहान लहान होत जाणारे मोती असल्यास त्याला 'अवघाटक', एकसारख्या मोत्यांच्या सराला 'तरल प्रतिबंध' म्हणत.[४२] हे सर्व प्रकार थोड्याफार फरकाने वराहमिहिराने आपल्या बृहत्संहिता या ग्रंथाच्या ८१व्या अध्यायात (श्लोक ३१ ते ३६) सांगितले आहेत.

ह्या अलंकारावरून तसेच माला, हार, यष्टि इत्यादी सूक्ष्म प्रकार उपप्रकारावरून हे तथ्य लक्षात येते की अलंकाराची संख्या खूप असावी.

अर्थशास्त्राच्या दुसऱ्या अधिकरणाच्या बाराव्या अध्यायापासून चौदाव्या अध्यायापर्यंत सुवर्ण आणि त्यांच्या व्यवसायासंबंधी सविस्तर वर्णन आहे त्यावरून अलंकार निर्मितीचा व्यवसाय भरभराटीला आला होता असे स्पष्ट होते.

सोमेश्वराने आपल्या मानसोल्लासात तीन प्रकारच्या आभूषणाचा उल्लेख केला आहे.[४३] पहिल्या प्रकारात त्याने अशा अलंकारांचा समावेश केला आहे जे अलंकार स्त्रीपुरुष दोघेही धारण करीत. दुसऱ्या प्रकारात फक्त स्त्रियांच्या अलंकारांचा समावेश केला. तिसऱ्या प्रकारात फक्त पुरुषांच्या अलंकारांचा समावेश केला.

**पहिला प्रकार –**

यात त्याने एकावली, हार, वर्णसर, ब्रह्मसूत्र, पदक, हे कंठाभरण, केयूर, कटक ही हस्तभूषणे, द्विहीरक, वज्र, रविमण्डल, नन्द्यावर्त, नवग्रह,

वेष्टक, त्रिहिरक, शक्तिमुद्रिका हे आठ अंगठीचे प्रकार, मुक्ताताडक, द्विराजिक, पूर्णमध्य, वज्रगर्भ, मण्डन, कुण्डल ही कर्णभूषणे असे एकवीस प्रकारचे अलंकार त्याकाळी स्त्रीपुरुष उभयता धारण करीत असावेत.

**दुसरा प्रकार (स्त्रियांची आभूषणे) –**

हंसतिलक (केशभूषण), चूडामंडन, चूडिभूषण (शिरोभूषण), मुकुल (कर्णभूषण), साहिका (कण्ठाभरण), बाहुवलय (बाहुभूषण), चूडक अर्धचूडक, दण्डक(दण्डभूषण), कांचीदाम (कटिभूषण), पादचूडक (पादभूषण), कटक अंदुका (हस्तभूषण), पादघर्घरिक (पैंजण) राढका (ध्वनिहीन पादभूषणे), यमला (जोडवे) ही सर्व आभूषणे रत्नजडित असायची.

**तिसरा प्रकार – (पुरुषांची आभूषणे)**

शेखर, मुकुल (शिरोभूषण), शिरोवेष्टन (मोत्यांच्या सरांनी संपूर्ण मस्तकाला सुशोभित करणारे आभूषण), दलक (वाघाच्या शेपटीच्या केसांनी बनविलेले सोन्याचे रत्नजडित भूषण).

संस्कृत साहित्यातील वेद, रामायण, महाभारत, पुराण, कालिदास, बाण, श्रीहर्ष, जयदेव इत्यादी साहित्यिकांच्या रचनांमधील तसेच अर्थशास्त्र, नाट्यशास्त्र, बृहत्संहिता इत्यादी शास्त्रग्रंथांतील अलंकरणाचा आढावा घेतला असता खालील निष्कर्ष हाती येतात.

(१) अलंकार धारण करणे हा प्रसाधनाचा महत्त्वपूर्ण भाग आहे. त्याला रसाकरकोषात देहधार्य असे म्हटले आहे.

(२) अलंकाराचा जन्म मानवाच्या जन्मासोबतच झाला. अलंकाराचा हेतू शरीराला सुशोभित करण्यासोबत दुष्ट शक्तीपासून रक्षण करणे हा ही होता. पुढे अलंकार हे शालीनता प्रतिष्ठा, मंगलता आणि सौभाग्य यांचे प्रतीकचिह्न बनले.

(३) वेदकाळापासून भारतीयांना स्वर्णलंकाराची आवड होती. वेदकाळी रुक्म,खादी, शिप्र, ओपस इत्यादी अलंकार अस्तित्वात होते.

(४) अलंकारांचे मुख्य दोन प्रकार अस्तित्वात होते.
(i) निसर्गनिर्मित - यात फुले, पुष्पमाला इत्यादींचा समावेश होता.
(ii) मानवनिर्मित - यामध्ये सुवर्णमोत्यांचे तसेच रत्नांचे अलंकार समाविष्ट होतात.

(५) फुलांचा शृंगार हा त्याकाळी दैनंदिन जीवनाचा एक भाग होता. त्यात गळ्यात फुलांच्या माळा धारण करणे, केसात फुले माळणे आणि हातात फूल धारण करणे यांचे प्रचलन होते.

(६) त्यावरून त्याकाळी फुलांची शेती अथवा पुष्पवृक्षाची लागवड मोठ्या प्रमाणात होत असावी असे दिसते. त्यातून त्याकाळच्या समृद्ध पर्यावरणाचा संकेतही मिळतो.

(७) नाट्यशास्त्रात फुलांच्या हारांचे तसेच सुवर्णादी अलंकारांचे आठ प्रकार सांगितले आहेत आणि ते धारण करण्याच्या पद्धतीवरून चार प्रकार सांगितले.

(८) बाराव्या शतकातील सोमेश्वराने स्त्री-पुरुष उभयता धारण करीत असलेल्या अलंकारांचे एकवीस प्रकार सांगितले तर केवळ स्त्रिया धारण करीत असलेल्या अलंकारांचे अठरा प्रकार सांगितले. केवळ पुरुष धारण करतात अशा अलंकाराचे चार प्रकार सांगितले. म्हणजे एकूण त्रेचाळीस प्रकारच्या अलंकारांची फार मोठी श्रेणी त्याकाळी अस्तित्वात होती.

(९) सोमेश्वराने सांगितलेल्या त्रेचाळीस प्रकारावरून, नाट्यशास्त्रातील बारा प्रकारच्या वर्गीकरणावरून आणि अर्थशास्त्रातील माळेचे अठरा प्रकार लक्षात घेता आपल्या पूर्वजांची अलंकाराविषयीची सूक्ष्म दृष्टी आणि त्याविषयीचे प्रगाढ चिंतन लक्षात येते.

(१०) अलंकारांच्या वरील वैविध्यपूर्ण प्रकारावरून त्याकाळच्या लोकांची अलंकारांची अत्यधिक आवड अधोरेखित होते. प्राचीन

काळी स्त्री- पुरुष सुवर्णादी अलंकारांनी आपादमस्तक अलंकारांनी नटलेलेअसत.

(११) प्राचीन काळी स्त्री-पुरुष दोघेही अलंकार धारण करीत. आज काही तुरळक अलंकार वगळता (अंगठी, गोफ इ.) स्त्रियाच अधिक अलंकार धारण करतात.

(१२) वराहमिराने आपल्या बृहत्संहिता या ग्रंथात सोन्याचे नऊ प्रकार, रत्नांचे २२ प्रकार यांचे उत्पत्तीस्थाने, त्यांच्या किमती सांगितल्या आहेत.[४४] शारंगधराने विविध प्रकारे तांब्यापासून सोने व चांदी कशी बनवायची याचे उपाय सांगितले.[४५] तर अर्थशास्त्रात १२,१३ व १४ या तीन अध्यायात सोन्याचे प्रकार, रंग, गुण मिळण्याचे स्थान, सोने शुद्ध करण्याचे प्रकार, सुवर्ण परीक्षा इत्यादी विषयी विस्तृत माहिती दिली आहे.[४६] सोमेश्वराने मोत्यांचे प्रकार, त्यांची उत्पत्तीस्थाने, मुक्तापरीक्षा, रत्नपरीक्षा, मरकत परीक्षा, त्यांचे मूल्य इत्यादी विषयी सविस्तर सांगितले आहे. यावरून त्या काळी सराफा बाजार तेजीत होता आणि आभूषण निर्मितीचा व्यवसाय चरमोत्कर्षाला पोहोचला होता असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. ही परिस्थिती साधारण १२व्या शतकापर्यंत असावी, त्यानंतरच्या काळात परकीय आक्रमणाने भारताच्या वैभवाला ओहोटी लागली असावी.

(१३) आज अस्तित्वात असलेली पारखी, रत्नपारखी, सराफ,जोहरी, सोनार, ही आडनावे त्या त्या घराण्यातील परंपरेने चालत आलेले उद्योग आणि त्यांना परंपरेनेच अवगत असलेले सुक्ष्म कौशल्य प्रकट करतात.

(१४) तसेच प्राचीन काळी सोनार ,माळी, गंधविक्रेते (गांधी) यांचे व्यवसाय भरभराठीला आले असावे आणि त्यांना समाजात अतिशय प्रतिष्ठा असावी असे वाटते.

(१५) संस्कृत प्रसाधनांच्या इतिहासातील सुमारे दीड–दोन हजार वर्षांचा काळ हा भारताच्या इतिहासातील सोनेरी पानच आहे. भारताच्या या सोनेरी वैभवामुळेच परकीय आपल्या देशाकडे आकर्षित झाले आणि त्यांनी आपल्या देशाला अक्षरश: लुटले.

(१६) तरीही आज एकूण भारतीय स्त्रियांच्या जवळील सुवर्ण साठा लक्षात घेता ते त्या सुवर्ण काळाचेच अवशेष ठरतात. भारतीय स्त्रियांची ही सुवर्णप्रियता त्या वैभवशाली परंपरेचा परिपाक होय.

(१७) भारतीय स्त्रियांची अलंकारांची आवड ही पूर्वजांच्या गुणसूत्रांतूनच संक्रमित झाली आहे असे म्हणणे वावगे ठरणार नाही. आजही ती आवड कायम आहे. जगाच्या पाठीवर अलंकारांचा सोस हे भारतीयांचे असाधारण वैशिष्ट्ये आहे.

(१८) सारांश त्याकाळी प्रसाधनकला, अलंकार निर्मिती कला, पुष्पनिर्मिती कला, समृद्ध अवस्थेत असतील यात शंकाच नाही.

(१९) आपल्या पूर्वजांचे प्रसाधनांचे वेड, दैनंदिन जीवनातील त्यांचे महत्त्व यावरून भारतीयांची जीवनासक्ती, सौंदर्यासक्ती आणि भोगवाद यावर प्रकाश पडतो.

----

**संदर्भ सूची** –

---

१. विक्रमांकदेवचरितम् १/२५
२. अमर ३/२८३९
३. रसरत्नसमुच्चय ४/५
४. रसरंगतरंगिणी २३/१५४
५. अश्वत्थाची पाने पृ.२३९
६. सुश्रुतसंहिता अ.१६
७. अश्वत्थाची पाने पृ.२३७
८. भारतीय संस्कृती कोष, पृ.२६७
९. म. ज्ञानकोष, प्रस्तावना खंड, पृ.२१
१०. ऋग्वेद ३/८/६७, ऋग्वेदिक आर्य, पृ.१५८
११. तत्रैव, १४/१/११२ पृ.१५८

१२. तत्रैव, पृ. १५८
१३. तत्रैव, पृ.१५९
१४. तत्रैव
१५. वा.रामायण २/३९/१५-१६
१६. तत्रैव ४/६/२२
१७ तत्रैव ४/१७/५
१८ तत्रैव ५/२२/२६
१९ तत्रैव ५/२२/२८
२० तत्रैव २/३९/१५-१६
२१ सभापर्व ९/५-६
२२. उत्तरमेघ १६, पूर्वमेघ ६१
२३. पूर्वमेघ २
२४. शाकुं.अंक ३
२५. पद्मपुराण भूमिखंड, ८७/८९
२६. रत्नावली १/१७
२७ गीतगोविंदम्, २/१३
२८. तत्रैव २/६
२९. पद्यचुडामणि ४/१७
२९ A तत्रैव
३० कुमार ४/१३
३० A मृच्छकटिक़ ५/३८
३१. पूर्वमेघ २६
३१.A ऋतु २/२४
३२. कादंबरी, पृ.१३५
३३. उत्तरमेघ २
३४. उत्तरमेघ २
३५. रितिकालीन हिन्दी साहित्य में उल्लिखित वस्त्राभरणों का अध्ययन, पृ.६९
३६. नाट्यशास्त्र २३/११-१२
३७. कामसूत्र ३/१५
३८. मानस. प्र.३/७
३९. मानस ३/७/१०४६-४८
४०. कामसूत्र ४/५
४१. अर्थ.- २/११/२९, पृ.१२२
४२. तत्रैव, पृ.१२३
४३ तत्रैव, पृ.१२२
४४. मानस.३/७/१०६६-११३२
४५. बृहत्संहिता अ.८०-८३
४६. शिल्पशास्त्र आयुर्वेद:, पृ.७३

४७. अर्थ. पृ.१३३-१४५

## प्रकरण पाचवे

# संस्कृत साहित्यातील विलेपन

।। अच्छं विलेपनं रम्यमङ्गसौख्यप्रदायकम् ।।

विलेपन हे पवित्र, रमणीय आणि शरीराला
अत्यंत सुख देणारे आहे.

मानसोल्लास

# प्रकरण पाचवे
# संस्कृत साहित्यातील विलेपन

आज प्रसाधनात ज्या मुख्य साधनांचा समावेश होतो ज्याला आज Cosmetics हा शब्द रूढ आहे. त्याला प्राचीन काळी ‘विलेपन’ असे म्हणतात आणि एकूण प्रसाधनसामग्रीचा तो फक्त एक चतुर्थांश भाग होता. आज जसे क्रिम, पावडर, फेसपॅक, लिपस्टिक इत्यादी वस्तूंनी बाजारपेठ आणि युवतींची मने दोन्ही काबीज केली आहेत. काहीशा तशाच प्रकारच्या वस्तू, जसे विविध सुगंधी लेप, अनुलेपन, विलेपन, अंगराग, चूर्णक, विशेषक इत्यादी पूर्वीही मोठ्या प्रमाणात वापरात होत्या.

प्रसाधनात षोडशशृंगार हा शब्द प्रचलित आहे ते सोळा शृंगाराचे प्रकार सुभाषितरत्नावलीत आले आहे.

आदौ मज्जन चीरहारतिलकं नेत्रांजनं कुण्डले
नासामौक्तिककेशपाशरचना सत्कंचुकं नूपुरौ।
सौगन्ध्यं करकंकणं चरणयोरागोरणन्मेखला
ताम्बूलं करदर्पणं चतुरता शृंगारक: षोडश:।।[१]

त्यातील बरेचसे प्रकार पारंपारिक प्राचीन विलेपन प्रसाधनात मोडतात. शृंगाराचे १६ प्रकार पुढील प्रमाणे आहेत –

(१) मज्जन (स्नान) (२) चीर (वस्त्रधारण)(३) हार (४) तिलक (५) अंजन (काजळ) (६) कुंडल (७) नासालंकार (८) केसपाशरचना (९) कंचूक (१०) नुपूर (११) सुगंधित द्रव्याचा

प्रयोग (अत्तर इ.) (१२) कंकण (१३) चरण राग (१४) मेखला (१५) तांबूल (१६) दर्पण

वरील सोळा शृंगारात स्नान, तिलक, अंजन, सुगंधी द्रव्य,चरणराग, तांबूल या सहा गोष्टींचा संबंध विलेपनाशी आहे. विलेपन शरीरावर लावण्यापूर्वी स्नान हा महत्त्वाच्या विधीची गणना पूर्वजांनी प्रसाधनात केली आहे. आजही 'मेकअप' करण्यापूर्वी चेहरा स्वच्छ धुवायला सांगतात, तसे आपल्या पूर्वजांनी शरीराच्या स्वच्छतेला म्हणजेच स्नानाला फार महत्त्व दिले.

**स्नान** - भारतात स्नानाला एक मंगल आणि धार्मिक कृत्य मानले आहे त्यामुळे आजही विवाहादी प्रसंगी किंवा पूर्वी राज्याभिषेक प्रसंगी पवित्र जलांनी सर्वासमक्ष स्नानविधी होत असे. सुगंधित पाण्यांनी गग्गुळ, सैन्धव, चोल सज्जरस इत्यादीत दूध किंवा पाणी मिसळून विविध प्रकारात बनविलेले उटणे अंगावर मळून स्नान करण्याचे वर्णन सोमेश्वर देवांच्या अभिलषितार्थ चिंतामणीत आले आहे. असे हे नित्य स्नान आयुष्य वाढविणारे आणि लक्ष्मी वाढविणारे आहे असे त्याने म्हटले आहे.[२]

**अभ्यंग** - हा स्नानापूर्वीचा विधी आहे. स्नानापूर्वी तिळाच्या तेलाने संपूर्ण शरीराला मालीश केले जायचे त्याला अभ्यंग असे म्हणत. वात्सायनाच्या कामसूत्रावरील टीकेत यशोधराने स्पष्टच सांगितले आहे. ''तीलानाम् अभ्यंजनं सुभगंकरणम्।''[३]

अभ्यंगानंतर शरीराचा तेलकटपणा निघावा यासाठी लोध्राचे चूर्ण शरीरावर रगडत. अभ्यंगाची प्रशंसा करताना वाग्भट म्हणतो -

अभ्यङ्गमाचरेन्नित्यं, स जरा-श्रम-वातहा।
दृष्टिप्रसादपुष्ट्यायुः स्वप्नसुत्वक्दार्ढ्यकृत्।।[४]

अभ्यंगानंतर शरीराला उटणे लावत. ज्याला उद्वर्तन म्हणतात आजही दिवाळीसारख्या उत्सव प्रसंगी उटणे लावून त्वचा रगडून साफ केले जाते पूर्वीच्या ह्या स्नानविधीचा अवशेष आज दिवाळीसारख्या प्रसंगी आपण जतन केला आहे.

**विभिन्न अनुलेपन आणि सुगंधी द्रव्य –**

स्नानानंतर शरीराला सुगंधित करण्यासाठी त्वचेचा रंग उजळण्यासाठी तसेच त्वचा कोमल बनविण्यासाठी विविध प्रकारचे सुगंधित लेप लावले जात. पाणिनीच्या अष्टाध्यायीमध्ये उत्सादक, उद्वर्तक, परिचेषक, अनुलिपिका, प्रलेपिका, विलेपिका इत्यादी परिचारक आणि परिचारिकांचा उल्लेख आला आहे.[५]

विलेपनाचे प्राचीन साहित्यात अनेक उल्लेख आढळतात. रामायणात विविध अनुलेपनांचा आणि अंगरागाचा उल्लेख आला आहे. राजा महाराजांकडे स्नानविद्येत कुशल अशा दासी असायच्या. स्नानाचे पाणी चंदनाने सुगंधित केल्या जात असे. स्नानापूर्वी उटणं आणि मालीश याद्वारे शरीराचा मळ दूर केल्या जात असे. भारद्वाज मुनींच्या आश्रमात भरताच्या स्नानासाठी आणि प्रसाधनासाठी उटणे, चूर्ण, तेल आणि गरम पाणी यांची व्यवस्था केली होती.[६] सोबत उगाळलेला चंदन, स्वच्छ आरसा, कपड्यांचा ढीग, छत्री लाकूड आणि चामड्याचे पादत्राण, काजळाच्या डब्या, कंगवे आणि कूर्च नीट ठेवले होते.[७] अनसूयेकडे गेलेल्या सीतेला उत्तम अनुलेपन आणि अंगराग प्राप्त झाला जो तिच्या सौदर्याला सुरक्षित आणि ताजेतवाने ठेवत होता आणि अनुलेपन इत्यादीद्वारे नियमित प्रसाधन करीत असे. म्हणून वाल्मिकींनी तिला ‘प्रतिकर्मनित्या’ म्हटले आहे.[८]

कालिदासाच्या साहित्यातही कुंकुम, चंदन, अगरू, अलक्तरस, अंजन, कालीयक, कालागुरू, गोरोचना इत्यादी वस्तूंचा वारंवार उल्लेख ऋतुसंहार, कुमारसंभव, मेघदूत, रघुवंश इत्यादी काव्यामध्ये तसेच शाकुंतल, मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय नाटकातही येतो. तसेच बाणभट्टाची कादंबरी याशिवाय कामसूत्र, अर्थशास्त्र या सूत्राग्रंथातही येतो.

चंदनाची विशेषता सांगताना अर्थशास्त्रात म्हटले आहे. हलके मऊ अधिक काळाने सुकणारे, तूपासारखे अंगाला चिकटणारे, सुकल्यानंतर सुगंध दरवळणारे, विकाररहित उष्णता दाह कमी करणारे, स्पर्शाला सुखद वाटणारे चंदन उत्तम असते. ''लघुस्निग्धश्यानं सर्पिस्नेहलेपि गंधसुखं त्वगनुसार्यनुल्वर्णम - विराग्युष्णसहं दाहग्राहि सुखस्पर्शनमिति चंदनगुण:।''[९]

श्रीमद्भागवत पुराणात कुब्जेचा शृंगारवर्णनाचा प्रसंगी कृष्ण तिला म्हणतो, ''देहि आवयोरंगविलेपनं उत्तमं श्रेयस्ततस्ते न चिरात् भविष्यति।''[१०] पुराणकाळात शरीरावर कुंकुम तसेच चंदन इत्यादीचा लेप करण्याची पद्धत होती. बुद्धकालीन समाजातही गंध आणि विलेपनाचा इतका अतिरेकी प्रयोग होता की विरक्तीच्या मार्गाला लागलेले बौद्ध भिक्षू देखील सर्वसामान्य नागरिकांसारखे गंधविलेपनाचा वापर करीत त्यामुळे भगवान गौतमबुद्धाने त्यांना तसे न करण्याबाबत बजावले आहे.[११] त्या काळच्या या प्रसाधनांच्या अतिरेकी वापरामुळे कदाचित भर्तृहरीने देखिल त्या सर्व प्रसाधनांचा वेगळ्या संदर्भात निषेध केला आहे.

केयूरा न विभूषयन्ति पुरुषं हारा न चन्द्रोज्ज्वला

न स्नानं न विलेपनं न कुसुमं नालङ्कृता मूर्धजा:।

वाण्येका समलङ्करोति पुरुषं या संस्कृता धार्यते।
क्षीयन्ते खलु भूषणानि सततं वाग्भूषणं भूषणम्।[१२]

सारांश त्याकाळी विलेपनाचे प्रचलन शिगेला पोहोचले होते. त्यासाठी कस्तुरी, चंदन, अगुरू, केसर, कापूर इ. द्रव्यांचा लेपासाठी विशेष उपयोग होत असे. त्या विलेपन द्रव्यांचा क्रमशः विचार करू.

**चंदन** – चंदनाला अनुलेपात अग्रगण्य स्थान मिळाले आहे.

त्वचेला गोरे, कोमल करणाऱ्या आणि थंडावा देणाऱ्या चंदनाचे स्निग्ध पदार्थात मिश्रण करून अत्यंत पातळ लेप तयार केला जात असे. उष्णतेपासून रक्षण करण्यासाठी विरहीणी स्त्रिया शीतलोपचारासाठी या चंदन लेपाचा उपयोग करीत. अर्थशास्त्रात सोळा ठिकाणाहून प्राप्त होणाऱ्या नऊ रंगाच्या आणि सहा प्रकारच्या गंधानी युक्त असा चंदनाचा उल्लेख आला आहे.

**कुंकुम** – प्राचीन संस्कृत साहित्यात केसराला कुंकुम म्हणत. काश्मिरात प्राधान्याने उगवणाऱ्या विशिष्ट फुलातील पराग तंतूंना केसर म्हणतात. कालिदासाने 'स्कन्धाल्लग्न कुंकुम केसरम्,'[१३] (रघुवंश ४/६७) या श्लोकात कुंकुमाच्या फुलांच्या मऊसार तंतूना केसर म्हटले आहे. मेघदूतात कदम्बाच्या पराग तंतूना केसर म्हटले आहे.[१४] 'नीपं दृष्टा हरितकपिशं केसरैरर्धरूढैः' (पूर्व मेघदूत २२)

चंदनाप्रमाणे केसराचा प्रयोग अनेक पद्धतीने होत असे. अनुलेपनासाठी इतर सुगंधी द्रव्याच्या मिश्रणाने तर कधी केवळ केसरांचा पातळ लेप केल्या जाई. केसराचा लेप त्वचेला पिवळा गोरेपणा सुगंध देतो आणि त्वचेला कोमल बनवितो. केसर समशीतोष्ण असल्याने सर्व ऋतुमध्ये त्याचा प्रयोग केल्या जात.

केसराचा गुण लक्षात घेऊन आजही काही कंपन्या साबणात केसर असल्याचा दावा करून ग्राहकांना त्याकडे आकृष्ट करतात.

गरमीच्या दिवसात केसरासोबत कापूर पावसाळ्यात अगुरू आणि थंडीत कस्तूरी आणि अगुरूचे मिश्रण उत्तम मानल्या जाते हा कामिनींचा सर्वाधिक मनपंसत लेप मानला जाई.[१५]

**कस्तूरी** – हा विशिष्ट जातीच्या हरणाच्या नाभीत सापडणारा सुगंधित पदार्थ असून त्याला मृगमद असेही म्हणतात. चंदन आणि केसराप्रमाणे कस्तूरीचाही प्रसाधनात उपयोग होत असे. कस्तूरीचा उष्ण गुणधर्म असून त्याचा लेप शीतकाळात लावत.

**कापूर** – अर्थशास्त्रात त्याला भद्रश्रीय म्हटले आहे. कपूर वृक्षातून निघणाऱ्या द्रव पदार्थाला सुकवून कापूर बनवतात. कापराचे अनेक वर्ण आणि प्रकार आहेत. परंतु उज्चल वर्णाच्या कापराला श्रेष्ठ मानतात. कापराचा उपयोग अनुलेपनासाठी स्वतंत्र न करता चंदन, केसर, कस्तूरी, गुलाबजल इत्यादीत मिसळून करीत.

**अगुरू** – आज अगुरूसाठी ऊद किंवा अगर शब्द प्रचलित आहे. या द्रव्यापासून बनल्यामुळे अगरबत्ती किंवा उद्‌बत्ती असे म्हटले जाते. हे एका विशेष वृक्षाच्या मूळापासून बनविले जाते. त्या मूळांना दीर्घकाळ जमीनित गाडून उद तयार केला जातो. आयुर्वेदात त्याला अत्यंत गुणकारी औषधी मानली जाते. सुश्रुताने ह्याचे तेल तिक्त कटू, काषाय, दुष्ट व्रणशोधक, कृमि, कुष्ठ, कफ आणि वायुनाशक आहे असे सांगितले आहे.[१६] चंदनासोबत मिश्रण करून याचा लेप केल्या जात असे.

राजघराण्यातील स्त्रियांचा विलेपनादी सौंदर्य प्रसाधनाचे काम करण्यासाठी प्रसाधिकांची व्यवस्था असे. अश्वघोषाच्या

'सौंदरानन्द' महाकाव्यातील पुढील उल्लेखावरून ही गोष्ट लक्षात येते.

काचित्पिपेषाङ्ग विलेपनं हि वासोऽङ्गना काचिदवासयच्च।
अयोजयत्स्नानविधिं तथान्या जग्रन्थुरन्याः सुरभिः स्रजश्च।[१७]

कोणी स्त्री अंगलेपाचे पेषण करीत होती तर कोणी वस्त्रांना सुगंधित करीत होती. कोणी स्नानविधीचे आयोजन करीत होती तर कोणी स्त्रिया माळा गुंफत होत्या.

प्रसाधिकेचा उल्लेख महाभारतात आला आहे. अज्ञातवासात द्रौपदी विराटाच्या घरी सैरंध्री म्हणून राहात होती. ती सुदेष्णेला आपला परिचय देताना म्हणते, 'मला विविध केशरचना करता येतात, गंध उत्तम उगाळता येतं, मी मोगरा, कमलपुष्प, चाफा यांच्या आकर्षक आणि सुंदर माळा मला गुंफता येतात. यापूर्वी मी सत्यभामा आणि द्रौपदीची सेवा केली आहे. माझे नाव मालिनी आहे.'(विराट पर्व ९/१४-१६) याचा अर्थ प्रसाधिकेला केशरचना, विलेपन आणि माळा गुंफणं हे कौशल्य आत्मसात असणे आवश्यक होते. बौद्ध साहित्यामध्ये 'पिप्पली' गावात राहणाऱ्या एका निर्धन ब्राह्मणाने जवाच्या चुर्णाचा लेप शरीरावर लावल्याचा उल्लेख आहे.[१८] याचा अर्थ विलेपन लावण्याची पद्धत गोरगरीबांमध्येही प्रचलित होती.

वात्सायनाने आपल्या कामसूत्रात विलेपन करण्यापूर्वी अनुलेपन लावण्यासंबंधी सांगितले आहे. ते अनुलेपन सुगंधी तेलात मिसळून लावत असत.

''मात्रया अनुलेपनं प्रभुतानुलेपनादि ग्रहणात्
नागरकः स्यात्, कार्यानुष्ठाने प्रस्तुत्वात्।।''[१९]

''नागरकाची दिनचर्या सांगताना वात्सायन म्हणतो – नागरकाने प्रात:काळी उठून शौचमुखमार्जन करून योग्य प्रमाणात मस्तकावर चंदनादीचा लेप करून, केसांना धूपाने सुवासित करून, सुगंधित हार धारण करून, लाक्षारसाचा प्रयोग करून, आरशात चेहरा पाहून, सुगंधित विडा खाऊन आपल्या दैनंदिन कामकाजास सुरवात करावी.[२०]

यावरून त्या काळी संपन्न समाजातील साधारण नागरिकाची दिनचर्या कशी होती, किती रसिकतेने तो जीवनाचा आनंद उपभोगत होता हे दिसून येते.

अशा संपन्न जीवनाचे चित्रण संस्कृत साहित्यात आपल्याला ठायी ठायी दिसून येते. त्या काळी स्त्री-पुरुष दोघेही शरीरावर लेप लावत. विविध लेप लावण्याचे उद्देश खालीलप्रमाणे होते –

(१) ऋतुकालानुसार त्वचेला वातावरणाशी समायोजित करणे.
(२) त्वचा मृदू, मुलायम, चमकदार राहावी.
(३) त्वचेचा वर्ण उजळावा.
(४) त्वचेचे घामाच्या दुर्गंधीपासून रक्षण.

मुखावर लेप लावण्याचे सुश्रुताने पुढील लाभ सांगितले आहेत.

मुखलेपाद् दृढं चक्षु: पीनगण्डं तथाननम्।
अव्यंगपिडिकं कान्तं भवत्यंबुजसन्निभम्।।[२१]

लेप कसा द्यावा तो किती पातळ असावा यासंबंधी पुढील सूचना आचार्य चरकाने दिल्या आहेत.[२२]

(१) लेप नेहमी ताजा, ओला उगाळून लावावा.

(२) खूप वेळापासून उगाळून ठेवलेला किंवा एक दिवस शिळा असलेला लेप लावू नये.
(३) पहिला लेप नीट काढल्याशिवाय दुसरा लावू नये.
(४) शरीरावरून एकदा काढलेला लेप पुन्हा लावू नये.
(५) लेप जास्त पातळ किंवा घट्टही नको. लेप घट्ट केल्यास त्वचेचे छिद्र बंद होऊ शकतात. त्यामुळे तो दाह निर्माण करणारा ठरू शकतो. याउलट लेप पातळ हलका लावला की त्याचे गुणधर्म उष्ण असले तरी तो शीतलता देतो.

विलेपनाचे दोन प्रकार अस्तित्वात होते (१) अनुलेपन (२) विलेपन. अनुलेपन हा प्रसाधनाचा पाया होता तर विलेपन हा कला, कौशल्याचा भाग होता.

सोमेश्वराने आपल्या 'मानसोल्लास' या ग्रंथात 'विलेपनोपभोग' या शीर्षकाखाली २८ श्लोकात राजाने विलेपन कसे करावे ते सांगितले आहे. सुरुवातीला विलेपनाची प्रशंसा करताना तो म्हणतो –

''विलेपनोपभोगोऽयं कथ्यते भोगिनां प्रियः।
अच्छं विलेपनं रम्यमंगसौभाग्यदायकम्।।''[२३]

विलेपन शरीराला सुखविण्यासाठी आणि मनाला प्रसन्न वाटावे म्हणून करतात. त्या काळी ऋतुप्रमाणे लेप किंवा लेपाची मूलद्रव्ये बदलत असत. कारण प्रत्येक ऋतुनुसार शरीराची गरज वेगवेगळी असते.

सोमेश्वर म्हणतो – वसंत ऋतुमध्ये कापूर, अगुरु, चंदन, कस्तुरी आणि कंकोळ यांच्यापासून बनविलेले यक्षकर्दम नावाचे

विलेपन लावावे. ग्रीष्मामध्ये अत्याधिक उष्णतेमुळे घाम खूप येतो तेव्हा घामाचा दुर्गंध दूर करण्यासाठी सान्ध्यलेप लावावा.[२४]

चंदनाच्या ग्रंथिल मूळाचा गंध तीव्र असतो. स्पर्शाला शीतल असते. कापले असता लाल दिसते आणि घासले असता पिवळे दिसते आणि सुकल्यावर पांढरे दिसते. नागकेसर, कापूर, केवडा, मोगरा आणि पाटलपुष्प यांच्या वासाने सुंगधित झालेल्या आणि चांदण्यासारखे शीतल गुणधर्म असलेल्या चंदनाचे विलेपन करावे.

निदाघे शीतलं लेपं नृपः कुर्यात्समुज्ज्वलम्।
श्रीखण्डं तादृशं भव्यं निघृष्टं पोषित पुनः।।[२५]

काश्मिर देशात उत्पन्न होणारे लाल हरिचंदन तसेच केशर आणि कापूर यांना एकत्र चांगले उगाळून लाक्षारसासारख्या रंगांच्या (लाल रंगांच्या) तेलात मिसळून जो लेप तयार होतो तो लेप वर्षाऋतूत आपल्या संपूर्ण शरीरावर लावावा.[२६]

हेंमत आणि शिशिर थंडीच्या ऋतूत 'पुल्लींग लेप' लावावा. पुल्लींग लेपासाठी तारुण्याने मुसमुसलेल्या नरमृगाच्या बेंबीमधील गोलाकार कुंकवाप्रमाणे लालसर, तेजस्वी, चमकदार अशी कस्तुरी घ्यावी. ती खलामध्ये चांगली खलून पाण्यात कालवून तिचा लेप करावा. तसेच अत्यंत सुगंधित चंदनाला कमल केशरासोबत एकत्र उगाळून तो लेप शरद ऋतूत लावावा. या लेपात सुगंधित तेल मिसळून थंडीच्या दिवसात त्याचे अनुलेपन करावे.[२७]

उत्पलभासितं लेपः शरद्काले प्रशस्यते।
सुगंधिततेलसंयुक्तं शीतकालेऽअनुलेपनम्।।[२८]

लेप शरीराच्या कोणकोणत्या भागावार लावावा या संबंधी सोमेश्वराने मार्गदर्शन केले आहे. सोमेश्वर म्हणतो मस्तक, खांदे, गळा, छाती आणि पोट या ठिकाणी अनेकविध रंगाचे आणि गंधाचे विलेपन करावे.[२९] सोमेश्वराच्या वरील विवेचनावरून पुढील बाबी लक्षात येतात –

(१) ऋतुनुसार वेगवेगळे लेप त्याकाळी लावत असत.
(२) ते शरीराच्या विविध भागावर लावत.
(३) ते वस्त्रभूषेला साजेसे असत. लेपामध्ये विविध रंग आणि गंध असे प्रकार असत.
(४) ते शृंगारासाठी लावले जात.

रामायणात वाल्मिकी म्हणतात, ''नामृष्टो नानुलिप्ताङ्गो ना सुगंधश्च विद्यते''[३०] अर्थात अयोध्येत अशी व्यक्ती नसे जी अस्वच्छ असे, जिच्या शरीरावर अंगराग नसे किंवा सुगंधीद्रव्य धारण केले नसेल.

वनवासाला जातांना अनसूयेने सीतेला अंगराग आणि अनुलेप भेट दिला त्यामुळे तिचे सौंदर्य अबाधित राहील, खुलेल आणि तिला नेहमी वापरता येईल आणि दीर्घकाळ चांगला राहील. अनसूया सांगते –

अंगरागं च वैदेहि महार्हमनुलेपनम् ।।
मयादत्तमिदं सीते तव गात्राणि शोभयेत।।[३१]

सुंगधित द्रव्याचें तत्कालीन प्रचलन लक्षात घेता आपल्या अर्थशास्त्र या ग्रंथात कौटिल्याने त्या द्रव्यांचा निर्मितीत सहयोग देणाऱ्या चंदन, अगरू, तैलपर्णिक, कपूर, कालेयक इत्यादी पदार्थांच्या निर्मितीच्या व्यापारांना राजकीय संरक्षण देण्याचा आदेश

दिला आहे. उपरोक्त वस्तूंच्या गुणदोषाचे त्यांच्या प्रकारांचे, त्यांच्या उत्पत्तिस्थानाचे विस्तृत वर्णन चाणक्याने केले आहे.[३२]

सारांश गंध आणि विलेनपाला प्राचीन भारतात अतिशय महत्त्वाचे स्थान मिळाले होते. आज चंदनलेपाला फक्त देवपूजेतच स्थान उरले आहे.

**रंजनद्रव्ये** – त्वचेच्या मूळ रंगाला, सौंदर्याला अधिक उठाव आणणे किंवा सौंदर्याला उद्दीप्त करणे हा विलेपन या प्रसाधनांचा हेतू होता. परंतु रंजनद्रव्याचे कार्य थोडे वेगळे होते. उपजत सौंदर्याला अधिक उठाव आणण्यासाठी किंवा त्या त्या अवयवांचे सौंदर्य पाहणाऱ्याच्या नजरेत भरावे यासाठी कुंकुम, तिलक, पत्रावली यांच्या सहाय्याने ओठ, नेत्र इत्यादी अवयव रंगवैविध्याने सजवून अधिक आकर्षित करण्यात येत असे. त्याला अंगराग असेही म्हणत. यासाठी पुढील रंजनद्रव्याचा वापर करीत.

**गोरोचन** – गाईच्या पित्ताशयापासून प्राप्त होणारा हा घन पदार्थ आहे. वंदनीय आणि मांगलिक असल्यामुळे संस्कृत साहित्यात त्याला वंदन असेही म्हटले आहे. हा पदार्थ दुर्लभ असल्यामुळे याऐवजी सिंदूर, रोळी इत्यादीचा प्रयोग होऊ लागला. या पदार्थाचा उपयोग रंजन द्रव्यात होतो.

**तिलक** – आज तिलक या शब्दाला अक्षरविपर्यय होऊन त्याला टिकली हे नामानिधान प्राप्त झाले. महाराष्ट्रात कुंकू आणि हिंदी प्रांतात त्याला बिंदी असे म्हणतात. फार पूर्वीपासून आपल्या संस्कृतीत तिलकाला महत्त्व आहे. आज हा प्रकार पुरुषांच्या कपाळावरून हद्दपार झाला असला तरी स्त्रिया विशेषत: विवाहित स्त्रियासाठी तो प्रतिष्ठेचा शृंगार झाला आहे.

चंदन, कुंकुम, केसर, कस्तूरी, गोरोचन, रोळी, सिंदूर इत्यादी द्रवापासून भुवयांमध्ये किंवा मस्तकावर मध्यभागी धारण करण्यात येणाऱ्या गोल बिंदूला बिंदी म्हणतात. यात चंदन, केसर, कस्तूरी इत्यादींची बिंदी कुमारिका लावत तर रोळी, कुंकुम सिंदूर इत्यादीची बिंदी विवाहित स्त्रिया लावत.

**अंजन** – अंजन म्हणजे काजळ. भारतात प्राचीन काळापासून या प्रसाधनाचे म्हणजेच काजळाचे प्रचलन होते. आजही डोळ्याचे सौंदर्य वाढविण्यासाठी त्याचा उपयोग करतात परंतु आज ते विविध स्वरूपात वापरतात जसे आयलायनर, पेन्सिल इत्यादी. त्याकाळी काजळ हा श्रृंगाराचा एक भाग असल्याने विरहिणी स्त्रिया अंजन लावित नसत.

अंजन हे डोळ्यांचे आरोग्य जपण्यासाठी, नेत्ररोग टाळण्यासाठी ही उपयोगात येत असे. आयुर्वेदात अंजन कसे बनवावे, सुरमा लावण्यासाठी सळई (शलाका) कशी बनवावी इ. विषयी माहिती आलेली आहे.[३३] कालिदासाने काजळाला 'मांगलिक' असेही म्हटले आहे.

तस्याः सुजातोत्पलपत्रकान्ते प्रसाधिकाभिर्नयने निरीक्ष्य।
न चक्षुषोः कान्तिविशेषबुद्ध्या कालांजनं मंगलमित्युपात्तम्।।[३४]

या काजळाच्या उत्पत्तीची एक कथा शतपथ ब्राह्मणात आली आहे. ती अशी – इंद्राने जेव्हा वृत्रासूराला मारले तेव्हा त्याच्या शरीराचे त्रिककूद पर्वतात रूपांतर झाले आणि त्याच्या बुबुळाचे काजळ बनले.[३५]

अथर्ववेदात या पर्वतावरून आणण्यात आणलेल्या काजळाला त्रैककुद म्हटले आहे.[३६] वृत्रासुराच्या बुबुळापासून

बनविलेले हे काजळ दुष्ट आत्म्यांच्या कुदृष्टीपासून, वाचविणारे समजले जात असे. हळूहळू ते जीवनोपयोगी, नित्य वापराच्या प्रसाधनाचा भाग बनले. आज ही संपूर्ण भारतात तान्ह्या मुलांसाठी काजळ हे अपरिहार्य प्रसाधन बनले आहे. त्याचा उपयोग डोळ्याचे आरोग्य राखणे, सौंदर्य वाढविणे त्याच बरोबर दृष्ट लागू नये म्हणून वापरले जाते. लहान वयापासून वापरले जाणारे हे एकमेव प्रसाधन आहे.

**पान** – भारतात पान (विडा) खाण्याची पद्धत अत्यंत प्राचीन काळापासून आहे. प्राचीन साहित्यात ताम्बुलपत्र, नागवल्ली, नागवल्लरी, नागपर्णी इत्यादी अनेक नावाने ओळखली जाते. पानांचा उपयोग मुखशुद्धी आणि ओष्ठरंजन असा दोन्ही प्रकारे होत असे. पानांचा विडा बनवितांना त्यात सुपारी, काथ, चुना हे मुख्य द्रव्य असले तरी कापूर, केसर, कस्तुरी इत्यादी एकुण तेरा द्रव्यांचा समावेश करून त्रयोदशगुणी विडा बनविला जाई. त्यातील केशर, कापूर, कस्तुरी, विलायची, जायपत्री, जायफळ इत्यादी सुवासित वस्तूमुळे मुखाची दुर्गंधी दूर होई. 'माऊथवाश' जे काम करते ते विड्याद्वारे केले जाई.पानाची प्रशंसा करताना वराहमिर म्हणतो–

कामं प्रदीपयति रूपमभिव्यनक्ति
सौभाग्यमावहति वक्त्रसुगान्धितां च।
ऊर्जं करोति कफजांश्च निहन्ति रोगां
स्ताम्बूलमेवमपरांश्च गुणान् करोति।।

**बृहत्संहिता अ.७७/३५**

विडा हा रसिकांच्या, धनिकांच्या जीवनाचा अविभाज्य भाग बनला होता. एवढेच नव्हे तर श्रीमंत समाजात, राजवर्गात त्या

संबंधित नोकर वर्ग असे.[३७] उदा. ताम्बुलिक, ताम्बुल वाहिका, ताम्बूली. कांदम्बरीमध्ये पत्रलेखा नावाची तांबुलकरंकवाहिनी आहे. ती नेहमी पानाचा करंडा सोबत ठेवत असते. चंद्रापीडाची परिचारीका म्हणून तिचा परिचय करून देतांना विलासवती म्हणते– 'तदियमिदानीमुचिता भवतस्ताम्बूलकरङ्कवाहिनीति कृत्वा मया प्रेषिता।' (कांदबरी पृ. ४९१) तांबूलासंबंधी पात्र ही व्यवहारात प्रचलित होती. उदा. ताम्बूलकरंडक, पतद्ग्रह, इत्यादी. कामसूत्रात नागरिकांचे हे आवश्यक प्रसाधन सांगितले आहे.[३८]

**ओष्ठ प्रसाधन** – प्राचीन काळी ओष्ठप्रसाधन दोन प्रकारे केले जाई. तांबूल भक्षण करून ओठ लाल केले जात आणि ओठांना लाक्षारसाने रंगविले जात. लाक्षारस पाण्याने निघून जाऊ नये म्हणून त्यावर मेण लावले जात.

''रेखाविभक्ति:सुविभक्तगात्र्या:किञ्चिन्मधुच्छिटविमृष्टराग:।
कामप्यभिख्यां स्फुरितैरपुष्पदासन्न लावण्यफलोऽधरोष्ठ:।।[३९]

'नैषधीयचरितात' श्रीहर्ष म्हणतो दमयन्तीने ओठांवर चमक येण्यासाठी लाक्षारसावर मेण लावले होते. मधाला सोडून अमृतासमान मधुर असलेल्या अधरामध्ये राहण्यासाठी उताविळ होऊन मेण तिच्या खालच्या ओठावर विसावले होते.

कालिदासाने ओष्ठरंजनांचा उल्लेख केला आहे. कुमारसंभवात शंकराला प्राप्त करण्यासाठी पार्वतीने तपस्वीनीचा वेष धारण केला तेव्हा तिने ओष्ठरागसोडून दिला. विसृष्टरागादधरान्निवर्तितस्त – नांगरागारूणिताच्चकन्दुकात्।[४०]

संस्कृतातील अन्य कवीनी देखील अलक्तक, जावक इत्यादीद्वारे ओष्ठरंजनाचे उल्लेख केले आहेत.[४१]

वात्स्यायनाने चौसष्ठ कलांमध्ये दात, वस्त्र आणि अंग रंगविण्याच्या कलेला स्थान दिले आहेत. (दशनवसनाङ्गरागः) याचा अर्थ त्या काळी दात आणि अंग रंगविण्याचे प्रचलन होते.[४२]

**मेंदी (मदयन्तिका)** - मेंदीचा उल्लेख रंजक द्रव्य म्हणून संस्कृत साहित्यात फारसा आढळत नाही. परंतु सुश्रुताने खालीलप्रकारे केला आहे.

हरितकीचूर्णमरिष्टपत्रं चूतत्वचं दाडिमपुष्पवृत्तम्
पत्रं च दद्यात् मदयन्तिकायाः लेपोऽङ्गरागो नरदेवयोग्यः।[४३]

**अलक्तक (अळता)** - रंजनद्रव्य म्हणून प्राचीन साहित्यात अलक्तकाचा म्हणजेच लाक्षारसाचा प्रचुर उल्लेख सापडतो. सौभाग्यवती स्त्रिया याचा नित्य उपयोग करीत. मेघदूतातील उज्जयिनी नगरीच्या वर्णनात अलक्तताने पावले रंगलेल्या स्त्रियांचा उल्लेख आहे. कालिदास म्हणतो उज्जयिनीतील प्रासाद स्त्रियांच्या पावलांना लावण्यात येणाऱ्या लाल रंगाने रंगले आहे.[४४]

त्याकाळी सर्वच स्त्रिया पायांना लाक्षारस लावित असतील. कारण उत्तरमेघात कल्पवृक्ष हा स्त्रियांच्या प्रसाधनांची संपूर्ण सामग्री पूरवितो असा उल्लेख आहे. त्यात कल्पवृक्ष 'चरणकमलन्यासयोग्य' असा लाक्षारसही देत असे असा उल्लेख आहे.[४५] मालविकाग्निमित्रम् नाटकात नायिका मालविकेला तिची दासी निपुणिका नृत्यस्पर्धेच्या वेळी लाक्षारस लावून देते असा उल्लेख आहे.[४६] शकुन्तला सासरी जातांना आश्रमातील वृक्ष तिला वस्त्रालंकारासोबत लाक्षारसही देतात.[४७] मालविकाग्निमित्रम् नाटकात वसंतऋतूचे सौंदर्य वर्णन करताना राजा अग्निमित्र म्हणतो वसंताच्या शोभेने स्त्रियांच्या सौंदर्यप्रसाधन विधीचा पाणउतारा केला आहे.

त्यात ओठाला लावलेला लाक्षारस,चेहऱ्याला लावण्यात आलेले विशेषक (चूर्ण), तिलकक्रिया (कुंकुम) आणि अंजन (काजळ रेखाटणे) या प्रसाधनविधिचा राजा उल्लेख करतो. वरील सर्व विवेचनावरून लाक्षारस सर्व स्त्रिया धारण करीत. आजही ही परंपरा मंगलप्रसंगी अखंडित आहे. आज विवाहाच्यावेळी वर-वधूच्या पायांना रंगविण्याची पद्धत आहे. फक्त लाक्षारसाऐवजी आज कुंकवाचा वापर करतात. तसेच पारंपारिक शास्त्रीय नृत्य प्रकारात (भरतनाट्यम् इ.) नर्तिका आपल्या तळपायाला आणि तळ हाताला रंगवितात. आज दैनंदिन जीवनात ह्या प्रसाधनाचा समावेश नसला तरी हरतालिका, तीज, करवाँ चौथ यासारख्या सणांना, विशेषत: उत्तरभारतात हे प्रसाधन पाय रंगविण्यासाठी वापरतात.

पायाचे आरोग्य जपण्यासाठी आयुर्वेदात पायाला तेल लावण्यास सांगितले आहे. पायाला तेल लावल्यामुळे खरखरीतपणा, बधिरता, रूक्षता लवकर दूर होते. पावलांमध्ये कोमलता, बल आणि दृढता येते. दृष्टी सदोज होते आणि वायू शांत होतो.[४८] आजही पायांच्या सौंदर्याला विशेष महत्त्व प्राप्त झाले आहे.

सोमेश्वराने देखिल 'पादाभ्यंगयोग' या शीर्षकाखाली पायांची काळजी कशी घ्यावी हे सांगितले आहे - ''डाव्या कुशीवर झोपून शतधौतघृताने किंवा लोण्याने पायांना मालिश करावे. दही, तेल,दूध, ताक या सर्वांनी किंवा यातील कोणत्याही दोन द्रव्यांनी, चंदनाच्या पाण्याने किंवा बोरीच्या फेसाने पायाला

मालिश करावे. याप्रमाणे त्याने विविध ऋतूंत कोणकोणत्या द्रव्याने

मालिश करावे हे सांगितले आहे. यानंतर त्यात मसूर, जव यांच्या पिठात हळदपूड टाकून ते मिश्रण पावलांना चोळून सुखद वाटणाऱ्या पाण्याने सर्व धुऊन घ्यावे. प्रत्येक जेवणानंतर अशी पादसेवा राजाने करून घ्यावे.[४९]

**स्तन प्रसाधन** – स्तनावर केसर, कस्तूरी, चंदन, गोरोचना इत्यादी सुगंधित द्रव्याने अनुलेपन करून याच द्रव्यांमध्ये रंग मिश्रित करून स्तनावर मकरीका, पत्रभंग इत्यादी रचना काढत.स्तनावर विविध चित्र रेखाटण्याचा उल्लेख कादम्बरीत येतो.

(१) ''हरिण इव हरिणलाञ्छने न लिखितागुरुपत्रभंग: पयोधरभारि।''[५३]

(२) ''निपुणिके! लिख मणिशालभञ्जिकास्तनेपु कुंकुमरपत्रभंगान्।''[५४]

**अर्थ** –

(१) दोन्ही स्तनावर काळ्या अगरूने तू हरिणाचे चिन्ह चितारले ना।

(२) निपुणिके! रत्नखचित पुतळ्यांनी युक्त असलेल्या या स्तनांवर केसराच्या रंगांनी पानेफुले काढून दे.

**कपोल प्रसाधन** – स्तनाप्रमाणे गालावरही चित्ररचना काढत. त्यात विविध रंगाचे ठिपके, वेलबुट्टी, काढत. तमालपत्र कापून ते शरीरावर चिपकवत आणि उरलेला भाग इतर रंगांनी रंगवत. त्याला पत्ररचना असे नाव होते.

''आलिख्य सख्या: कुचपत्रभङ्गीमध्ये सुमध्या मकरीकरेण ।
यत्रावदत्तामियमाति! या नं मन्येत्वदेकावलिनाकनद्या:।।''[५५]

कोण्या एका स्त्रीने सखीच्या स्तनावर मगर, मासोळ्या इत्यादी चितारल्या आणि मैत्रिणीला म्हणू लागली, माझ्या दृष्टीने तुझ्या माळेचा सर म्हणजे स्वर्गंगेचा प्रवाह आहे आणि मासोळ्या व मगरी त्याचे वाहन आहे.

**भ्रुकुटी प्रसाधन** – भुवयांच्या सुंदरतेमुळे नायिकांसाठी सुभ्रु, नतभ्रु इत्यादी विशेषणांची योजना संस्कृत कवींनी केलेली आहे. काळ्या आणि वक्राकार भुवया सौंदर्याचा मापदंड होते. त्याकाळी भुवया मसी, काजळ किंवा अञ्जनाने काळ्या करीत.

कालिदासाने पार्वतीच्या भूवयांचे 'शलाकाञ्जन – निर्मितेव'[५६] असे वर्णन केले आहे. यावरून काळ्या भुवया श्रेष्ठ मानल्या जात असत. म्हणूनच आचार्य चरकाने उत्तम भुवयांचे वर्णन करताना असे म्हटले आहे–

''प्रशस्तभ्रु– ईषत्प्रलम्बिन्यौ असंगते समे
सहंते महत्यौ भ्रुवौ।''[५७]

**पत्रावली रचना** – स्नान अनुलेपनानंतर प्रसाधनात तिलक, पत्रावली इत्यादी धारण केल्या जात असे. ज्या द्रव्यापासून लेप बनविल्या जाई त्याच द्रव्याने पत्रावली रचना केली जाईल पण तो लेप अधिक गडद दाट रंगाचा असे त्यात इतर रंगीत द्रव्यांचा उपयोग होई.

आधुनिक काळात टॅटू, बॉडिपेन्टींग हे प्रकार फँशनच्या दुनियेत तरुणांमध्ये विशेष प्रचलित आहेत.हाच प्रकार पूर्वी पत्रलेख, पत्रावली, विशेषक, विशेषकच्छेद्य, पत्रभंग, पत्रच्छेद्य इत्यादी नावाने प्रसिद्ध होता.

वात्सायनाने चौसष्ठ कलांमध्ये 'विशेषच्छेद्य' ही एक कला मानली आहे. भोजपत्र किंवा तमालपत्रासारख्या पानांना विशिष्ट आकारात कापून त्याला छाप्यासारखे बनवून कपाळावर, गालावर, स्तनावर विशिष्टाकृती रंगवून घेत. त्यालाच विशेषच्छेद्य किंवा पत्रच्छेद्यम् म्हणत. कदाचित पानावर छिद्र काढून बनविल्यामुळे त्याला पत्रच्छेद्य म्हणत असावे. विशेष हा शब्द , त्याचे महत्त्व आणि त्या विषयीचा आदर अधोरेखित करतो असे कामसूत्राचा टीकाकार म्हणतो. 'विशेषकच्छेद्यम्- विशेषकस्तिलको यो ललाटे दीयते तस्य भूर्जादि पत्रस्यायमेकप्रकारं छेदनमेवच्छेद्यम्। पत्रच्छेद्यमितिवक्तव्यम् विशेषकग्रहणमादरार्थम् विलासिनीनां प्रियत्वात्'[५०]

आज केसर, कुंकुम कपाळावर लावण्यासाठी विशिष्ठ ठप्पे मिळतात. तसाच हा प्रकार होता. विवाहप्रसंगी वधूच्या कपाळावर भूवयांच्यावर ठिपके काढून, वेलबुट्टी काढून सजविण्याची पद्धत २५-३० वर्षापूर्वी प्रचलित होती तोच हा प्रकार असावा.

'पत्रालेखवदन' हे सुवर्ण कमळाप्रमाणे शोभून दिसते असा उल्लेख रघुवंशात आहे. याचा अर्थ ही रचना चंदनाने करीत असावी त्यामुळे पाण्याने ती धुतल्या जात असावी.[५१]

कपाळ, गाल, आणि शरीराच्या इतर दर्शनीय भागावर तरुण-तरुणी विविध पानाफुलांच्या आकृत्या काढत.[५२] (श्री आपटेकृत संस्कृत इग्लिश शब्दकोश आ. द्वि. पृ. ९६५)चंदन, कस्तुरी, केशर इत्यादी पासून घट्ट रंग बनवित आणि त्यापासून शरीरावर नक्षी काढत असत.

**निष्कर्ष –**

(१) प्राचीन काळी विलेपन हे अत्यंत महत्वाचे प्रसाधन होते. स्नानानंतर प्रत्येक व्यक्ती विलेपन, तिलक, पत्रावली इत्यादी प्रसाधन करत असे.

(२) विलेपन लावण्यासाठी अनुलिपिका, प्रलेपिका, विलेपिका इत्यादी परिचारिका आणि परिचारक इ. नोकरवर्ग असे. तसेच स्नानापूर्वी अभ्यंग, उत्सादन, संवाहन, मर्दन या मालिशच्या प्रकारांचेही प्रचलन होते. त्यासाठी उत्सादक, उद्वर्तक, संवाहक, मर्दक,परिषेचक असा नोकरवर्ग धनिकाकडे असे.

(३) प्रसाधनासाठी प्रसाधिकांची विशेष योजना स्त्री आणि पुरुष दोघांसाठीही होती.

(४) रामायण काळापासून विलेपनाचे प्रचलन होते असे दिसते. सीतेला अनुसूयेकडून उत्तम अनुलेपन व अंगराग प्राप्त झाला होता. वनवासातही ती प्रसाधन करून आपले सौंदर्य जपत होती.

(५) अनुलेपनात चंदन, केसर, कापूर, अगुरु, कालायक, कालागुरु इत्यादी सुगंधी द्रव्यांचा वापर होई. तसेच नेत्रप्रसाधन, ललाटप्रसाधन, कपोलप्रसाधन, ओष्ठप्रसाधन, स्तनप्रसाधन यासाठी अंजन, तिलक, गोरोचना, मन:शिला, हरताल आणि लाक्षारस यासारख्या रंजन द्रव्यांचा उपयोग केला जाई.

(६) त्वचा नाजूक व संवेदनक्षम असल्यामुळे वातावरणातील

बदलाचा त्यावर लवकर परिणाम होतो. त्यामुळे अशा

विषम वातावरणाशी त्वचेला समायोजित करणे हा लेप लावण्याचा प्रमुख उद्देश होता. तसेच वर्ण उजळणे आणि घामाच्या दुर्गंधीपासून त्वचेचे रक्षण करणे हा ही विलेपनाचा उद्देश होता. लेपामुळे दृष्टी चांगली होते. गाल व चेहऱ्याची त्वचा दृढ होते आणि मुख कमळाप्रमाणे सुंदर दिसते. असे आयुर्वेदात सांगितले आहे.

(७) लेप लावण्यासंबंधी आयुर्वेदात ज्या सूचना दिल्या आहेत त्या लक्षात घेता. लेप लावण्या संबंधी शास्त्रशुद्ध चिंतन झाले होते असे दिसते.

(८) विलेपन या प्रसाधनाला भारतीय परंपरेने मांगल्याचा दर्जा दिला होता. त्यामुळे तिलक, काजळ, लाक्षारस ही प्रसाधने विवाहादी समारंभात मांगल्य सूचक म्हणून धारण करीत.

(९) पानालाही प्रसाधनात मानाचे स्थान होते. शृंगाराचे उद्दीपन करणारे म्हणून तांबूल पत्राकडे पाहात. धनिकांकडे तांबूलवाहिका, तांबूली असा नोकरवर्ग असे. त्याच्याजवळ सतत पानाचे तबक/करंडा असे. सोबत ती नायिकेच्या प्रसाधनाचेही काम करे.

(१०) आधुनिक युगात जी-जी प्रसाधने उपलब्ध आहेत ती सर्व प्राचीनकाळी २-३ हजार वर्षापूर्वी उपलब्ध होती. हे लक्षात आल्यावर आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. लिपस्टिक, नेलपेंट, कोल्डक्रिम, सनस्क्रीन, पावडर ही सर्व प्रसाधने प्राचीन काळी होती आणि ती विलेपन या सदरात समाविष्ट होत होती आणि याशिवाय 'पत्ररचना' किंवा 'विशेषक' हा वेगळा प्रकार त्याकाळी अस्तित्वात होता.

जो आता दिसत नाही. म्हणजे प्राचीनकाळची विलेपने आजच्या युगापेक्षा अधिक व्यापक आणि प्रगत होता असे म्हटल्यास अतिशयोक्तीचे ठरणार नाही.

(११) प्राचीन काळी प्रत्येक पुरुषाजवळ प्रसाधनांची पेटी (सिक्थकरंडीका) असल्याचा उल्लेख वात्सायनाने कामसूत्रात केलेला आहे.

(१२) विलेपनात वापरले जाणारे सुगंधी द्रव्य ज्या वृक्षापासून मिळत त्या वृक्षांची म्हणजे चन्दन, अगुरु, केशर, कापूर,लाख यासारख्या वृक्षांची लागवड फार मोठ्या प्रमाणात होत असावी.

(१३) या वृक्षांच्या सुगंधाबद्दल आणि विविध गुणधर्माबद्दल पूर्वसूरींना अफाट ज्ञान होते असे दिसते. त्यातून त्यांची प्रयोगशीलता, संशोधनवृत्ती आणि पर्यावरणीय ज्ञानाचा सखोल सुक्ष्म अभ्यास दिसून येतो. आयुर्वेदाच्या रूपात त्यांनी तो वारसा आपल्या स्वाधीन केला आहे.

(१४) विलेपन या प्रसाधनामुळे असे लक्षात येते की निसर्गाच्या साथ संगतीने पूर्वजांचे जीवन बहरले होते. समृद्ध निसर्गाचे दोहन मनुष्य अनंत हस्ताने करत होता पण त्याचबरोबर निसर्गाचे रक्षणही तो पूज्य आणि कृतज्ञ भावाने करीत होता असे पुराण वाङ्मयावरून लक्षात येते. तात्पर्य निसर्ग आणि मानव हातात हात घेऊन नांदत होते. आज प्रदूषणाचा अमर्याद विळखा पाहता पूर्वीसारखे 'निसर्गाकडे चला' ही हाक देण्याची आणि आपले समृद्ध पर्यावरण वाचविण्याची गरज आहे

## संदर्भसूची


१. Annuals of B.O.R.I. Page. No. 313
२. ३/२/९४०-४२
३. कामसूत्र ७/१/६
४. अष्टांगहृदय अ.२/८-९
५. पाणिनीकालीन भारतवर्ष पृ. १३२
६. वा. रा. २/६५/७-८
७. वा. रा. २/९१/७४-७९
८. वा. रा. २/११८/१८-१९
९. अर्थशास्त्र पृ. २/११/२९
१०. भागवत पुराण स्कंध १०/४२/१-२
११. विनयपिटक पृ. १४९ चुल्लवग्ग प्राचीन भारत के प्रसाधन पृ.७७
१२. नीतिशतक श्लोक १५
१३. रघु- ४/६७
१४. पूर्वमेघ २२
१५. ऋतु ५/९
१६. सुश्रुत संहिता सू. अ. ४५
१७. सौंदर ४/२
१८. विनयपिटक पृ. १४९ चुल्लवग्ग प्राचीन भारत के प्रसाधन पृ.७७
१९. कामसूत्र ४/१/५
२०. कामसूत्र पृ. तत्रैव
२१. सुश्रुत संहिता पृ. चि.अ. २४/६५
२२. चरकसंहिता २१/९८/१०४
२३. मानसोल्लास ३/५/९८०
२४. मानसोल्लास ३/५/९८३-८४
२५. मानसोल्लास ३/५/९८४-८५
२६. मानसोल्लास ३/५/९८९-९०
२७. मानसोल्लास ३/५/९९१-९२
२८. मानसोल्लास ३/५/१००४-०५
२९. मानसोल्लास ३/५/१००६-०८
३०. वा. रामायण २/६/१०
३१. वा. रामायण २/११८/१८-१९
३२. अर्थशास्त्र पृ. १२६-१२८

३३. शारङ्गधर अ. १३/६४-६५, ७१,७२
३४. कुमार ७/२०
३५. Journal of I.S.Of O.A. Page. No. 105
३६. अथर्व ४/९/९
३७. मानसोल्लास ३/५/९५९-६०
३८. कामसूत्र पृ. १२८
३९. कुमार ७/१८
४०. कुमार ५/११
४१. किरात ८/४०
४२. कामसूत्र पृ. ८७४
४३. सुश्रुत संहिता चि.अ.२५/४३
४४. पूर्वमेघ ३२
४५. उत्तरमेघ ११
४६. मालविका पृ. २३ अंक ३
४७. शांकुतल ४/५
४८. चरक संहिता सु.अ.५/९०-९१
४९. मानसोल्लास ३/१५/१६३३-३८
५०. आपटे शब्दकोष पृ.९६५
५१. रघुवंशम् १६/१७
५२. ऋतुसंहार ५/१२
५३. कांदबरी विलासवती वर्णन
५४. कांदबरी विलासवती वर्णन
५५. नैषध ७/२४
५६. कुमार १/४७
५७. चरक शा. अ. ८/५५


----

## प्रकरण सहावे

# उपसंहार

श्यामा सरूपकरणी पृथिव्या अध्युद्‌धृता ।
इदं रूपं प्रसाधय पुना रूपाणि कल्पय ।।

हे सुन्दर बनविणाऱ्या श्यामे, तुला पृथ्वीतून उपटून काढले आहे. ह्या रूपाला सुंदर बनव, सौंदर्याला सिद्‌ध कर.

अथर्ववेद

# प्रकरण सहावे
# उपसंहार

वेदकालापासून म्हणजे स्थूलमानाने सुमारे इ.स. पूर्व ५००० वर्षांपासून ते बाणभट्टापर्यंत (इ.स. ६ वे शतकापर्यंत) आणि चाणक्यापासून (इ.स. पूर्व तिसरे शतक) ते सोमेश्वरापर्यंत (इ.स. बारावे शतक) अशा अंदाजे साडेपाच-सहा हजार वर्षांच्या काळात अस्तित्वात असलेल्या संस्कृत साहित्यातील प्रसाधनांचा आढावा येथे घेण्यात आला आहे.

आजपासून पाच हजार वर्षापूर्वी आणि त्याआधी कितीतरी वर्षे भारत देश किती समृद्ध होता, स्त्रिया आपल्या प्रसाधनाच्या बाबतीत किती जागृत होत्या, विवाह इ. प्रसंगी खास प्रसाधिकांची योजना होत होती. या सर्वावरून येथील समृद्ध संस्कृती, विलासी जनजीवन, स्वर्णादी धातूंची विपुलता, रेशमाची पैदास, चंदनादी सुगंधी द्रव्याची विपुलता, चर्मोद्योगाची भरभराट याची कल्पना येते आणि पाच हजार वर्षापूर्वीचे भारत राष्ट्र भौतिक समृद्धीच्या अत्युच्च शिखरावर विराजमान होते हे संस्कृत साहित्यातील प्रसाधनावरून सिद्ध होते.

साहित्य हे त्या काळाचं प्रतिबिम्ब असते. या न्यायाने प्राचीनतम संस्कृत साहित्यात अलंकाराचा प्रचुर उल्लेख त्याकाळाचे भारताचे पराकोटीचे वैभव प्रकट करतो. परंपरेने चालत आलेले अलंकार, त्याचे प्रचलन, महत्त्व, समृद्ध भारतीय समाजातील

संस्कृती, तत्कालीन चालीरीती, परंपरा यांचाही परिचय संस्कृत साहित्यात घडतो.

तरुण स्त्रियांना अलंकृत, मंडित करणाऱ्या, सजविणाऱ्या सर्व वस्तूंना प्रसाधन म्हणतात.संस्कृतमध्ये भूषण, अलंकार, अवतंसन, आभरण, मण्डन इत्यादी शब्द एकाच अर्थाने योजिले जातात. प्रसाधनांच्या जागी या सर्वांचा पर्यायी शब्द म्हणून उपयोग केल्या जातो. त्यातही अलंकार हा शब्द अधिक प्रचलित आहे आणि अधिक व्यापक आहे. अलंकार म्हणजे जो शोभेला (सौंदर्याला) अलं म्हणजे पूर्ण करतो.

प्राचीन काळी प्रसाधनात केशभूषा, वेशभूषा, देहभूषा आणि विलेपन अशा चार गोष्टींचा समावेश होत असे म्हणजे आजच्यापेक्षा प्रसाधनाची व्याख्या तेव्हा अधिक व्यापक होती. आज प्रसाधनात ज्या मुख्य साधनांचा समावेश होतो त्याला प्राचीन काळी 'विलेपन' असे म्हणतात आणि एकूण प्रसाधनसामग्रीचा तो फक्त एक चतुर्थांश भाग होता.

**वस्त्रप्रसाधन –**

- मानवाच्या प्रकृतीकडून संस्कृतीकडे जाणाऱ्या प्रवासाचे वस्त्र हे प्रतीक आहे. कालदृष्ट्या चार प्रकारच्या प्रसाधनात वस्त्रांचा क्रमांक वरचा आहे. संपूर्ण संस्कृत साहित्याचे विहंगावलोकन केले असता वस्त्रप्रसाधनाचा हा उज्ज्वल इतिहास भारतीय संस्कृतीची उन्नतावस्था, तेथील विविधता,

भारताची प्राचीन परंपरा आणि वैभव यांना अधोरेखित करतो.

- वेदात वस्त्रांचे तानेबाणे यामध्ये देवता वास करतात अशी श्रद्धा होती. त्यामुळे वस्त्राला दैवी अधिष्ठान देऊन शरीराच्या रक्षणांचे दायित्व त्या देवांना बहाल करण्याचा लोकविश्वास यातून प्रतीत होतो.

- वेदकाळी वस्त्र हे सौंदर्यात भर टाकते अशी कल्पना रूजली होती म्हणून तेही प्रसाधनात अंतर्भूत होते ह्या उत्तरकालीन धारणेचे बीज वेदातच सापडते. भारतात वेदकाळापासून भरजरी वस्त्रांचे प्रचलन होते. त्या भरजरी वस्त्रात सोने, हिरे जडवलेले असत. त्याकाळी पांढऱ्या (उज्ज्वल) वस्त्राला मान होता. सुंदर वेष घातलेल्या व्यक्तीला समाजात प्रतिष्ठित मानले जात.

- वेदकाळी वस्त्र विणण्याचे काम घरोघरी स्त्रिया करीत. घरोघरी वस्त्र निर्मितीच्या उपक्रमाला कुटीरोद्योगाचे स्वरूप आले असावे असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरणार नाही. स्त्रिया पतीचे वस्त्र स्वत: विणत असे. या मागे प्रेमाच्या धाग्याने पतीला बांधून ठेवण्याची भावना होती. ही गोष्ट वैदिक आर्यांच्या कौटुंबिक प्रेमाला अधोरखित करते.

- त्याकाळी स्त्रियांसाठी रंगीत वस्त्रांचे प्रचलन होते. अर्थात वस्त्र रंगविण्याचे तंत्र वेदकालीन समाजाला अवगत होते.

- कालिदासाच्या साहित्यातही आश्रमवासी शकुन्तलेचा किंवा तपस्यारत पार्वतीचा वल्कलवेष, विवाहसमयी पार्वतीचा वधूवेष, परित्यक्ता शकुन्तलेचा विरह वेष, दुष्यन्ताचा मृगयावेष, ऋतूसंहारातील कामिनींचा वेष, कुमार कार्तिकेयाचा युद्धवेष, अशा विविध वेशभूषेचे वर्णन आढळते. तसेच बाणभट्टाच्या कादंबरीतील कादंबरी, महाश्वेता, सरस्वती आदि नायिका- उपनायिकांचे वेष, स्वप्नवासवदत्तम् मधील वासवदत्तेचा अवन्तीदेशाचा वेष यावरून देश, काल, प्रसंगानुकूल आणि वर्णाश्रमधर्मानुकूल वस्त्र परिधान करण्याची पद्धत होती असे म्हणता येईल. स्त्रिया सरसकट कौशेय, क्षौम, दुकुल अशी वस्त्रे धारण करीत.

- अंशुक, कार्पास, क्षौम, कौशेय, दुकुल, चर्मवस्त्र रांकव, रोमज, कंबल असे वस्त्राचे प्रकार वेदकाळापासून अस्तित्वात होते.

- त्याकाळी चीनदेशाहून रेशमी वस्त्राची (चीनांशुक) आयात होत होती. म्हणजे त्याकाळापासून वस्त्रांचा आंतरराष्ट्रीय व्यापार होत असे.

- वस्त्र धारण करण्याचा हेतू शालीनता, मंगलता आणि प्रतिष्ठा हा होता असे लक्षात येते. आजच्या सारखी विवाहादी उत्सव प्रसंगी अहेर (वस्त्रदान) देण्याची पद्धत होती. वस्त्रांना सुगंधित करण्यासाठी पटवास देखील असे.

**देहप्रसाधन** (अलंकरण) –

अलंकाराचा जन्म मानवाच्या जन्मासोबत झाला. अलंकाराचा हेतू शरीराला सुशोभित करण्यासोबतच दुष्टशक्ती पासून रक्षण करणे हा होता. पुढे अलंकार हे शालीनता, प्रतिष्ठा, मांगल्य आणि सौभाग्य यांचे प्रतीक बनले.

- वेदकाळापासून भारतीयांना सुवर्णालंकाराची आवड होती. शरीराला अलंकृत करण्यासाठी संस्कृत साहित्यात विविध नैसर्गिक भूषणाचा तसेच सुवर्णादी अलंकाराचा उल्लेख सर्वत्र आढळतो. प्राचीन शिल्पावरून कधीकधी तर वस्त्रप्रावरणापेक्षा अलंकारांचे अधिक महत्व होते असे वाटते.

- नाट्यशास्त्रात फुलांच्या हारांचे तसेच सुवर्णादी अलंकाराचे आठ प्रकार सांगितले आहेत आणि ते धारण करण्याच्या पद्धतीवरून चार प्रकार सांगितले आहेत. बाराव्या शतकातील सोमेश्वराने अलंकारांचे त्रेचाळीस प्रकार सांगितले आहेत तर अर्थशास्त्रात माळेचे अठरा प्रकार सांगितले आहेत. हे सर्व प्रकार लक्षात घेता भारतीयांची अलंकाराविषयीची सुक्ष्म दृष्टी आणि प्रगाढ चिंतन लक्षात येते. त्याचबरोबर भारतीयांची, अलंकाराची अत्यधिक आवड अधोरेखित होते.



- सुवर्णादी अलंकारासोबत फुलांचा शृंगार हा ही त्याकाळी दैनंदिन जीवनाचा भाग होता. साहित्यातील विविध

पुष्पाभरणांच्या उल्लेखातून त्या काळच्या समृद्ध पर्यावरणाचा संकेत मिळतो.

- प्रसाधनांच्या इतिहासातील विगत तीन-चार हजार वर्षांचा काळ हा भारताच्या इतिहासातील सोनेरी पानच आहे. आजही भारतीय स्त्रियांच्या जवळील अलंकाराच्या रूपात असलेला सुवर्ण निधी लक्षात घेता तो त्या वैभवशाली भारतीय इतिहासाचे जिवंत स्मारक ठरतो.

- भारतीय स्त्रियांच्या अलंकारांची आवड ही पूर्वजांच्या गुणसूत्रातूनच संक्रमित झाली आहे असे म्हणणे वावगे ठरणार नाहीत. आजही ती आवड कायम आहे. जगाच्या पाठीवर अलंकाराचा सोस हे भारतीयांचे असाधारण वैशिष्ट्य आहे.

- अलंकाराच्या उल्लेखावरून त्याकाळी सुवर्ण, रत्न आणि मौक्तिकाचे दागिने घडविण्याची कला आणि त्यासंबंधी व्यवसाय भरभराटीस आले असावे याबद्दल दुमत नसावे.

- आज अर्धी- अधिक बाजारपेठ आणि अर्थव्यवस्था स्त्रियांचे वस्त्र, अलंकार आणि प्रसाधने यांच्या उलाढालीने प्रभावित आहे. हजारो वर्षापूर्वीही ती तशीच होती हे वरील विवेचनावरून लक्षात येते. कौटिल्याच्या अर्थशास्त्रातही वस्त्रप्रकार, आभूषणाचे प्रकार, सुगंधी द्रव्याचे प्रकार यांचे सविस्तर वर्णन आहे, सोने, चांदी, रत्न या साऱ्या वस्तू

त्याकाळी समाजाच्या आयव्ययाची साधने होत्या आणि कराच्या रूपात शासनाला यापासून उत्पन्न मिळत असे याचे तपशिलवार वर्णन अर्थशास्त्रात आले आहे. यावरून वरील विधानाला दुजोरा मिळतो.

- आज ज्याप्रमाणे जागतिक सुवर्णाच्या साठ्यापैकी अधिकाधिक सुवर्णसाठा भारतीय स्त्रियांच्या जवळ आहे असे म्हटले जाते ते भूतकाळातही ही बाब लागू होते असे म्हणण्यास हरकत नसावी.

- तत्कालीन भारतीय समाजाच्या अपार समृद्धिकडे संकेत करणारे महाभारतातील राजसूर्य यज्ञाचे वर्णन, त्याकाळी प्रचलित वस्त्रभरणे आणि त्याच्या निर्मितीसंबंधी कलेच्या उन्नतावस्थेचे परिचायक ठरते.

- याशिवाय उल्लेखनीय विशेष म्हणजे राजवंशातील स्त्रियांचे तसेच विवाहादी प्रसंगी स्त्री-पुरूषांचे प्रसाधन करण्यासाठी खास प्रसाधिकांची योजना करीत. महाभारतात अज्ञातवासात असतांना द्रौपदी सैरंध्री नावाने विराट राज्याच्या पदरी राणीची प्रसाधिका म्हणून काम करीत असे. मालविकेचे प्रसाधन करणारी निपुणिका प्रसाधन कलेत निपुण आहे. पार्वतीच्या विवाहाच्या वेळी प्रसाधिका तिचे प्रसाधन करून देते. थोडक्यात प्रसाधनाचा कौशल्यपूर्वक उपयोग करण्यासाठी प्राचीन काळी

प्रसाधिकांचीही योजना केल्या जात असे. वरील सर्व उल्लेख प्रसाधनकलेच्या प्रगतावस्थेचे द्योतक आहेत.

**केशप्रसाधन –**

- प्राचीन काळी केशप्रसाधनाला आजच्याप्रमाणे प्रसाधनात महत्त्वाचे स्थान होते. केशरक्षण, केशसमस्या निवारण, केशरंजन, केशरचना आणि केशभूषा (केशसज्जा) ह्या सर्व गोष्टींचा समावेश केशप्रसाधनात होत असे.

- वैदिक काळापासून भारतीय केसांविषयी जागृत होते. स्त्रियांच्या सोळा शृंगारात केसरचनेला आणि फुले, गजरे आणि अलंकारांनी केशसज्जा करणे ह्या दोन्ही गोष्टींना महत्वाचे स्थान होते.

- केस लांब, दाट आणि मजबूत असण्याकडे पूर्वजांचा कटाक्ष होता. काळे केस हे सौंदर्याचा मापदंड होता त्यामुळे केस काळे करणारे कलप,केसांच्या वाढीसाठी वेगवेगळे तेल, लेप, केसविषयक समस्येवरील उपाय ह्यांचे शास्त्रीय चिंतन आमच्या वैद्यक शास्त्राने केले आहे.या चिंतनाची सुरुवात वेदकाळापासून झालेली दिसते.

विलेपन -

- प्राचीन काळी विलेपन हे अत्यंत महत्वाचे प्रसाधन होते. स्नानानंतर प्रत्येक व्यक्ती विलेनप, तिलक पत्रावली इत्यादी प्रसाधन करत असे.

- विलेपन लावण्यासाठी अनुलिपिका, प्रलेपिका, विलेपिका इत्यादी परिचारिका आणि परिचारक इ. नोकरवर्ग असे. तसेच स्नानापूर्वी अभ्यंग, उत्सादन, संवाहन, मर्दन या मालिशच्या प्रकारांचेही प्रचलन होते. त्यासाठी उत्सादक, उद्वर्तक, संवाहक, मर्दक,परिषेचक असा नोकरवर्ग धनिकाकडे असे. प्रसाधनासाठी प्रसाधिकांची विशेष योजना स्त्री आणि पुरुष दोघांसाठीही होती.

- अनुलेपनात चंदन, केसर, कापूर, अगुरु, कालायक, कालागुरु इत्यादी सुगंधी द्रव्यांचा वापर होई. तसेच नेत्रप्रसाधन, ललाटप्रसाधन, कपोलप्रसाधन, ओष्ठप्रसाधन, स्तनप्रसाधन यासाठी विलेपन द्रव्य अंजन, तिलक, गोरोचना, मन:शिला, हरताल आणि लाक्षारस यासारख्या रंजन द्रव्यांचा उपयोग केला जाई.

- त्वचा नाजूक व संवेदनक्षम असल्यामुळे वातावरणातील बदलाचा त्यावर लवकर परिणाम होतो. त्यामुळे अशा विषम वातावरणाशी त्वचेला समायोजित करणे हा लेप लावण्याचा प्रमुख उद्देश होता. तसेच वर्ण उजळणे आणि

घामाच्या दुर्गंधीपासून त्वचेचे रक्षण करणे हा ही विलेपनाचा उद्देश

- विलेपन या प्रसाधनाला भारतीय परंपरेने मांगल्याचा दर्जा दिला होता. त्यामुळे तिलक, काजळ, लाक्षारस ही प्रसाधने विवाहादी समारंभात मांगल्य सूचक म्हणून धारण करीत.

- आधुनिक युगात जी-जी प्रसाधने उपलब्ध आहेत ती सर्व प्राचीनकाळी २-३ हजार वर्षापूर्वी उपलब्ध होती. हे लक्षात आल्यावर आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाही. लिपस्टिक, नेलपेंट, कोल्डक्रिम, सनस्क्रीन, पावडर ही सर्व प्रसाधने प्राचीन काळी होती आणि ती विलेपन या सदरात समाविष्ट होत होती आणि याशिवाय 'पत्ररचना विशेषक' हा वेगळा प्रकार त्याकाळी अस्तित्वात होता. जो आता दिसत नाही. म्हणजे प्राचीनकाळ आजच्या युगापेक्षा अधिक प्रगत होता असे म्हटल्यास अतिशयोक्तीचे ठरणार नाही.

- विलेपनात वापरले जाणारे सुगंधी द्रव्य ज्या वृक्षापासून मिळत त्या वृक्षांची म्हणजे चन्दन, अगुरु, केशर, कापूर,लाख यासारख्या वृक्षांची लागवड फार मोठ्या प्रमाणात होत असावी.

- या वृक्षांच्या सुगंधाबद्दल आणि विविध गुणधर्माबद्दल पूर्वसूरींना अफाट ज्ञान होते असे दिसते. त्यातून त्यांची

प्रयोगशीलता, संशोधनवृत्ती आणि पर्यावरणीय ज्ञानाचा सखोल सुक्ष्म अभ्यास दिसून येतो. आयुर्वेदाच्या रूपात त्यांनी तो वारसा आपल्या स्वाधीन केला आहे.

- विलेपन या प्रसाधनामुळे असे लक्षात येते की निसर्गाच्या साथ संगतीने पूर्वजांचे जीवन बहरले होते. समृद्ध निसर्गाच दोहन मनुष्य अनंत हस्ताने करत होता पण त्याचबरोबर निसर्गाचे रक्षणही तो पूज्य आणि कृतज्ञ भावाने करीत होता असे पुराण वाङ्मयावरून लक्षात येते. तात्पर्य निसर्ग आणि मानव हातात हात घेऊन नांदत होते.आज प्रदूषणाचा अमर्याद विळखा पाहता पूर्वीसारखे 'निसर्गाकडे चला' ही हाक देण्याची आणि आपले समृद्ध पर्यावरण वाचविण्याची गरज आहे.

- यौवन काळात, शृंगाराच्या वेळी आणि विवाहादी समारंभात सर्वच प्रसाधनाचे महत्त्व अधिक होते. प्रसाधन आणि अलंकारावरून त्याकाळची सौंदर्यदृष्टी आणि भारतीयांची कलासक्ती यांचा परिचय होतो. यावरुन आपल्या पूर्वजांचे प्रसाधनाचे वेड दैनंदिन जीवनातील त्याचे महत्व यावरुन भारतीयांची जीवनासक्ती, सौंदर्यासक्ती आणि भोगवाद यावर प्रकाश पडतो.

- आज प्रसाधनाला मराठीत साजशृंगार किंवा हिन्दीत सोलहशृंगार शब्द प्रचलित आहे. कारण शृंगार आणि प्रसाधन यांचा जवळचा संबंध आहे. म्हणून शृंगाररसप्रधान

कालिदासादी कवीच्या साहित्यात शृंगाररसाला परिपोषक म्हणून प्रसाधन व अलंकरणाची रेलचेल दिसून येते.

- शृंगार हा रसराज आहे. शृंगाराशिवाय जीवन अपूर्ण आहे. तो सृजनचा प्राण आहे. मानववंशाच्या सातत्याचे मूळ आहे. नायिकेचे प्रसाधन हे शृंगार भावनेला उद्दीपित करणारे साधन आहे. त्याला काव्यशास्त्रीय भाषेत आपण उद्दीपन विभाव म्हणू शकतो. म्हणून संस्कृत साहित्यात शृंगाराला उद्दीपित करणाऱ्या प्रसाधनांचा उल्लेख प्राचुर्याने दिसून येतो.

- प्रस्तुत संशोधनाने प्रसाधनशास्त्राच्या इतिहासाच्या अवधारणा बदलल्या असून आधुनिक प्रसाधन शास्त्रांचा उगम वेदात आणि आयुर्वेदात आहे हे मान्य करण्याची वेळ आली आहे असे म्हणण्यास हरकत नसावी.

----

## विविध केशरचना (गुप्तकाळ)

आम्रातक



चूडापाश



## मौर्यकाळ

आम्रातक



अलंकृतवेणी



## विविध वेणी प्रकार



पुरुषांच्या विविध केशरचना (गुप्तकाळ)











देहप्रसाधन-विविध अलंकार



सोळा शृंगार



मेखला, क्रंठहार इ



शिरोभूषण, ग्रैवेयक, अंगद



चूडामणी, कुंडल, हार, मेखला, नूपुर इ.

# संदर्भग्रंथ

## हिंदी


- अर्थशास्त्र(कौटिल्यकृत)- संपा.हरिनारायण शर्मा चौखंबा प्रकाशन प्र.आ.१९५२
- अश्वघोष की कृतियों में चित्रित भारतीय संस्कृति- डॉ. किश्वर जबीं नसरीन, हिंदुस्थान एकेडेमी, इलाहाबाद प्र. सं.१९८३
- अष्टांगहृदय(वाग्भटकृत)-श्रीअरुणदत्त मृगांकदत्त, चौखंबा संस्कृत प्रकाशन, दिल्ली २०१७
- उज्ज्वल नीलमणि- रूपगोस्वामी, निर्णय सागर प्रेस,
- ऋतुसंहार (कालिदासकृत)- संपा. डॉ.राजकिशोर त्रिपाठी, प्रकाशन केंद्र लखनऊ प्र.सं. १९६२
- ऋग्वेदिक आर्य- पं. राहुल संस्कृत्यायन
- ऋग्वेद- चौखंबा प्रकाशन, वाराणसी, द्वि आ. १९६४
- कादंबरी (बाणभट्टकृत)- संपादक - डॉ. जयशंकर त्रिपाठी डॉ. विश्वनाथ भट्टाचार्य कृष्णदास अकादमी, वाराणसी प्र,.सं. १९९३
- कामसूत्र(वात्सायनकृत)- न्या.श्री देवदत्तशास्त्री, चौ. सं. संस्थान, वाराणसी, पुनर्मुद्रण २०१२
- कालिदास और उसकी काव्यकला- विद्यामार्तंड विद्यालंकार, मोतीलाल बनारसीदास, वाराणसी १९५२

- किरातार्जुनीयम् (भारवीकृत) - आचार्य रामशरण अग्रवाल, चौ. सुरभारती प्रकाशन, वाराणसी १९८०
- चरकसंहिता- व्याख्याकार, आचार्य विद्याधर शुक्ल प्रो. रविदत्त त्रिपाठी,चौ. संस्कृत प्रतिष्ठान, दिल्ली २०१७
- चर्मरोगनिदर्शिका- आचार्य रघुवीरप्रसाद त्रिवेदी, प्रकाशन श्री बैद्यनाथ आयुर्वेद भवन, प्रा. लि. नागपुर, तृ. सं.
- नाट्यशास्त्र- संपा. मनमोहन घोष, चौ. सुरभारती प्रकाशन, वाराणसी १९९८
- नैषधीयचरितम्- संपा. आचार्य शेषराजशर्मा चौ.सुरभारती प्रकाशन, वाराणसी २००२
- पद्मपुराण- संपा, पं.श्रीराम शर्मा, संस्कृती संस्थान प्रकाशन, बरेली, पृ.सं.१९६८
- पाणिनीकालीन भारतवर्ष- डॉ. वासुदेवशरण अग्रवाल, चौखंबा विद्याभवन, वाराणसी सं. २०१४
- प्राचीन भारत के प्रसाधन-श्री अत्रिदेव विद्यालंकार, भारतीय ज्ञानपीठ प्रकाशन काशी.
- प्राचीन भारत- डॉ. राजबली पांडेय विश्वविद्यालय प्रकाशन, वाराणसी, २०१५
- बुद्धचरितम् (अश्वघोषकृत)- संपा. महन्त रामचंद्रदास शास्त्री, चौ. विद्याभारती, वाराणसी, प्र.सं. १९९९
- भारतीय कला- वासुदेवशरण अग्रवाल , पृथिवी प्रकाशन, द्वि. सं. १९७७

- भारतीय संस्कृती और कला- वाचस्पती गैरोला, उत्तरप्रदेश, हिन्दी संस्थान, लखनऊ तृ. सं. २००६
- मालविकाग्नीमित्रम्(कालिदासकृत)- संपा. एम.आर. काळे, महेंद्र ए. शेठ ॲण्ड कं. मुंबई २ प्र. आ. १९६६
- रत्नावली (श्रीहर्षदेवकृत)- संपा. डॉ. रमेशकुमार झा, प्रकाशन केंद्र लखनऊ,.सं. १९६८
- रितिकालीन हिन्दी साहित्य में उल्लिखित वस्त्राभरणों का अध्ययन- डॉ. लल्लन राय, पंजाब युनिर्व्हसिटी, चंडीगढ, प्र.सं. १९९४
- वाल्मीकि रामायण- गीताप्रेस, गोरखपूर तृ. सं. १९३३
- शारङ्गधरसंहिता- संपा. डॉ. ब्रह्मानंद त्रिपाठी चौखंबा सुरभारती प्रकाशन वाराणसी प्र. सं. २०१६
- शिल्पशास्त्रे आयुर्वेदः- संपा. डॉ. श्रीकृष्ण जुगनू, प्रो. बी. एल. शर्मा चौ. कृष्णदास अकादमी, वाराणसी, प्र.सं. २००८
- शिशुपालवधम् (माघकृत)- चौखंबा सुरभारती प्रकाशन वाराणसी प्र. सं. २०१६
- श्री भागवतपुराण- गीताप्रेस गोरखपुर, पुर्नमुद्रण २०००
- सहृदयलीला- राजानक रूय्यक,काव्यमाला गुच्छ ५, निर्णयसागर प्रेस, १९५९
- सिद्धार्थचरितम् (बुद्धघोषविरचितम्)- संपा. स्वामी द्वारिकादास शास्त्री, बौद्ध भारती प्रकाशन, वाराणसी, प्र. सं. १९९४





- सुश्रुतसंहिता- आचार्य रघुवीरप्रसाद त्रिवेदी, चौ. सं. प्रतिष्ठान,

- सोमेश्वरकृत मानसोल्लास- एक सांस्कृतिक अध्ययन, डॉ. शिवशेखरमिश्र, चौ. विद्याभवन, वाराणसी, प्र.सं. २०२३
- सौंदरानंद (अश्वघोषकृत)- संपा. चिंताहरण चक्रवर्ती, रॉयल ॲस्थेटिक सोसायटी, कलकत्ता, प्र.सं. १९३९
- हर्षचरितम् (बाणभट्टकृत)- संपा. एम्. आर. काळे, महेंद्र ए. शेठ ॲण्ड कंपनी मुंबई, प्र. आ. १९६८

**मराठी**

- अग्निपुराण- संपा. प्र. न. जोशी, प्रसाद प्रकाशन, प्र. आ. १९०३
- अथर्ववेदाचा सुबोध अनुवाद- गृहस्थाश्रम भाग ३, संपा. पं. श्री. दा. सातवळेकर, स्वाध्याय मंडळ, पारडी, प्र.आ.
- अश्वत्थाची पाने-डॉ.स.अ.डांगे,हिन्दु धर्म संस्कृति मंदिर प्रकाशन,नागपूर, १९७४
- आयुर्वेदिक रसशास्त्र-वैद्य नीलेश चौधरी चौ. सुरभारती,प्रकाशन वाराणसी प्र. आ.२०१३
- कांदबरी (बाणभट्टकृत) - विमल पवनीकर, प्रसाद प्रकाशन, प्र आ. २००५
- कुमारसंभवम् -संपा. अंशुमती दुनाखे, प्रसाद प्रकाशन, २०१२
- दूतघटोत्कच(भासकृत)-संपा.डॉ.स्मिता होटे, मनोहर कथा प्रकाशन,नागपूर,२००४

- नीतिशतक–संपा.डॉ. हेमा गोखले,कालिदास संस्कृत विश्वविद्यालय,रामटेक,२००६
- पद्मपुराण (उत्तरार्ध)– संपा. प्र. न. जोशी, प्रसाद प्रकाशन
- पुष्पमाला– नागपूर विद्यापीठ प्रकाशन, प्र. आ. १९७८
- बृहत्संहिता(वराहमिहिरकृत)– संपा.कै.जनार्दन हरि आठल्ये, वरदा बुक्स, पुणे, तृ.आ. २०१५
- भरतमुनींचे नाट्यशास्त्र–गोदावरी केतकर, पॉपुलर प्रकाशन, मुंबई, द्वि.आ. १९६३
- महाभारत(विराटपर्व)– मराठी अनुवाद खंड३,डॉ.के.पां.जोग, विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे
- मानसोल्लास,(सोमेश्वरकृत)– अनु.नीलकंठ फडके, निपुण प्रकाशन, प्र.आ. २०१४
- मेघदूत– संपा. रा. द. किंजवडेकर, बोरवणकर चित्रशाळा प्रकाशन,द्वि.आ. १९५८
- मृच्छकटिक (शूद्रककृत) – संपा. डॉ. विजया रा. जोशी, सुयोग प्रकाशन, नागपूर प्र. आ. २०१०
- रघुवंशम् – संपा. बोरवणकर चित्रशाळा प्रकाशन ,पुणे
- शाकुंतलम् – संपा. रा.शं.वाळींबे,चित्रशाळा प्रकाशन ,पुणे

- स्वप्नवासवदत्तम्- संपा. म.कृ. देवधर सुयोग प्रकाशन,अमरावती,प्र.आ. २००३

- स्वामी विद्यारण्यकृत पंचदशीचे अध्ययन- विमल पवनीकर, विश्वभारती प्रकाशन, नागपूर, प्र. आ. २००५

- भागवतपुराण गीताप्रेस- गोरखपुर, पु. मुद्रण २०००

**कोषग्रंथ** -

(१) अमरकोष- संपा. वासुदेवशर्मा पणशीका, चौखंबा संस्कृत संस्थान, वाराणसी २०१६

(२) भारतीय संस्कृति कोष- संपा. महादेवशास्त्री जोशी, महाराष्ट्र राज्य संस्कृती मंडळ

(३) संस्कृत हिंदी कोष- वामन शिवराम आपटे, चौखंबा संस्कृत भवन, वाराणसी २०१६

(४) महाराष्ट्रीय ज्ञानकोश, संपा. श्री. व्यं. केतकर, प्रकाशन, महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळ लिमिटेड, नागपूर प्र. आ. १९२३

**नियतकालिक** - (१) दैनिक तरूण भारत २३.१२.२०१८

**अंतरजाल** - https://en.m.wikipedia.org

**ENGLISH**

(1) Harry's cosmetology, Wilkinson & Moore, Chemical publishing Co., Newyork, Page 64. 7th edi. 1982.

(2) Panchtantra , M.R. Kale, Motilal Banarisidas, FE. 1986 Delhi

(3) The Gitagovinda Jaydeva, Editor & Translator, Barbara, Stoler Miller, Motilal Banarisidas, FE. 1984 Delhi

**Journals -**

(1) Annals of Bhandarkar Research Institute, Pune

(2) Journal of Indian Society of Oriental Art.



**नाव – डॉ. सौ. स्मिता सुधीर होटे**

**पत्ता –** 20, के. डब्लू , ऑरबिटल एम्पायर, जयताळा, नागपूर.

**भ्रमणध्वनी –** 9970754511

**शिक्षण –** एम.ए., बी.एड्.,एम.फिल., पीएच.डी.(संस्कृत)
नागपूर विद्यापीठ, नागपूर
सर्व परीक्षा गुणवत्ता क्रमांकाने उत्तीर्ण

**पद** निवृत्त सहयोगी प्राध्यापक व अध्यक्ष संस्कृत विभाग,
लेडी अमृताबाई डागा महिला महाविद्यालय,
शंकर नगर, नागपूर
३३ वर्षांचा अध्यापन कार्याचा अनुभव

**प्रशासकीय अनुभव –** पूर्वअध्यक्ष – संस्कृत अभ्यास मंडळ,
रा.तु.म. नागपूर विद्यापीठ, नागपूर (२०१०–२०१५)
विविध प्राधिकारिणी सदस्य रा.तु.म. नागपूर विद्यापीठ, नागपूर,
आणि कालिदास संस्कृत विद्यापीठ, रामटेक, महाराष्ट्र
एल.एडी. महाविद्यालय स्थानीय व्यवस्थापन
समिती सदस्य.(२०१६–२०१८)

**पीएच.डी. मार्गदर्शन–** पाच विद्यार्थी
**एम.फिल्. मार्गदर्शन –** पाच विद्यार्थी

**पुस्तक संपादन – ०४**

(१)भासकृत दूतघटोत्कच
(२) बाणभट्टकृत शुकनासोपदेश
(३) संस्कृत पुष्पहार पाठ्यपुस्तक (बी.ए.-१)
रा.तु.म. नागपूर विद्यापीठ प्रकाशन
(४)संस्कृत मंजरी पाठ्यपुस्तक (बी.ए.३)
रा.तु.म. नागपूर विद्यापीठ प्रकाशन

**गौरव ग्रंथ संपादन** (१) तीरे संस्कृतीची गहने (डॉ.के.रा.जोशी) २००९
(२) तर्कवीरदर्शन (डॉ.नी.र.वऱ्हाडपांडे)२०११

**नियतकालिक संपादन - ०७**

(१) साप्ताहिक संस्कृत भवितव्यम्, (२००७-१०)
(२) Tarng college new letter (2004 – 2006)
(३) College Magazine ऊर्मि (2002-2012)
(४) College Research Journal (2006 – 2016)
(५) L.A.D.Platinum Jubelee Sovinour (2013)
(६) दर्पण त्रैमासिक (१९९६-१९९८)
(७) आदर्श Deparmental Journal (2016-2018)

**ग्रंथलेखन - ०४**

(१) वैदर्भीय संस्कृत कवी- दत्तात्रेय येरकुंटवार (मराठी)
(२)इतस्ततः (संस्कृत)(३) नाट्यत्रिदलम् (संस्कृत)
(४) ब्रह्मज्ञानी चरित्रकथामृत (मराठी)

**संयोजन-** राष्ट्रीय संस्कृत परिषदेचे आयोजन (७,८ ऑक्टो.२०१७)
संस्कृत जनपद संमेलन(७ जाने.२०१८)

**संस्कृत प्रचार -**

- नागपूर आकाशवाणीवरील संस्कृत कार्यक्रमात सुमारे ५५ भाषणे २० भाषापाठ प्रसारित
- ३० संस्कृत संभाषण वर्गाचे संचालन
- ३२ संस्कृत संभाषण वर्गाचे आयोजन
- विविध कार्यशाळा आयोजन, 
- ३० वर्षापासून संस्कृत दिवस व विविध आंतर

- महाविद्यालयीन स्पर्धांचे आयोजन,

**पुरस्कार –** महाराष्ट्र राज्य संस्कृत नाट्य स्पर्धेत अनुवादित केलेल्या नाटकाला द्वितीय पुरस्कार, (२०१२)

**दिल्ली संस्कृत संस्थानचा**

संस्कृत नाट्यलेखन प्रथम पुरस्कार, (२०१४),
संस्कृत नाट्यलेखन सहावा पुरस्कार (२०११),
संस्कृत भाषा प्रचारिणी सभेतर्फे संस्कृत प्रचार प्रसार कार्यासाठी गौरव.
अनेक राष्ट्रीय आंतरराष्ट्रीय राज्यस्तरीय परिषदात सक्रिय सहभाग
अनेक शोधनिंबध, प्रासंगिक वृत्तपत्रीय लिखाण प्रसिद्ध

---